






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४०    एप्रिल ते जून २०१२

'... बुडता बुडता सांजप्रवाही
अलगद भरूनी जावे ...!'

अनुक्रमणिका



उत्कृष्ट दिवाळी अंकाची अनेक पारितोषिके मिळालेला

# विशाखा

दिवाळी अंक २०१२
वर्ष ४७ वे

संपादक : ह.ल. निपुणगे

## 'विशाखा' दिवाळी अंक २०१२

## कवी ग्रेस विशेष पुरवणी

डॉ. द. भि. कुलकर्णी यांचा 'ग्रेस' यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा आणि व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणारा बीजलेख आणि खालील साहित्यकृतींचा परामर्श घेणारे विशेष लेख.

**काव्यसंग्रह**

- संध्याकाळच्या कविता : डॉ. प्रभा गणोरकर
- सांध्यपर्वातील वैष्णवी : डॉ. अविनाश सांगोलेकर
- सांजभयाच्या साजणी : प्रा. विश्वास वसेकर
- चंद्रमाधवीचे प्रदेश : डॉ. अविनाश आवलगावकर
- राजपुत्र आणि डार्लिंग : डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे

**ललितलेख संग्रह**

- मी मितवा : संजय भास्कर जोशी
- वाऱ्याने हलते रान : डॉ. संस्कृती आवलगावकर
- मृगजळाचे बांधकाम : डॉ. माधवी देसाई
- ओल्या वेळूची बासरी : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
  आणि कवी ग्रेस यांच्या निवडक आठवणी
- संध्यामग्न पुरुषाची लक्षणे : मनोहर सोनवणे
- चर्चबेल : डॉ. हेमंत खडके
- कावळे उडाले स्वामी : डॉ. रवींद्र शोभणे

विशेष साहित्यिक मूल्य असलेल्या या पुरवणीशिवाय ह. मो. मराठे, अनंत मनोहर, भारत सासणे आणि प्रा. वसंत मिरासदार यांच्या वैशिष्ट्यपूर्ण कथा.

सौ. हर्षदा पंडित यांचा ललितलेख आणि 'हलचल' या ह. ल. निपुणगे यांच्या आत्मचरित्रातील एक महत्त्वाचे प्रकरण. बँक ऑफ महाराष्ट्रमध्ये अगदी सुरुवातीपासून कार्यरत असलेले आणि चेअरमन होऊन निवृत्त झालेले डॉ. वसंत पटवर्धन यांनी लिहिलेल्या अनेक वैविध्यपूर्ण आठवणी–

***'असे हे बँकेचे ग्राहक!'***

भाजपाचे ज्येष्ठ नेते आणि गुजराथचे मुख्यमंत्री श्री. नरेंद्र मोदी यांचे डॉ. पद्माकर पुंडे यांनी रेखाटलेले श्वास व्यक्तिचित्र.

याशिवाय आणखी खूप काही. प्रत्येकाने आपल्या संग्रही ठेवून वाचलाच पाहिजे असा बहारदार अंक!
पृष्ठे २०० पेक्षा अधिक, मूल्य रु. १००/- फक्त. बहुरंगी मुखपृष्ठ.
रुपये शंभर आमचेकडे म. ऑ. ने पाठवून नोंद केल्यास आमच्या खर्चाने, रजि. बुकपोस्टाने, अंक दिवाळीपूर्वी घरपोच.

**विशाखा दिवाळी अंक २०१२**

**पुष्पक प्रकाशन**

३८१ अ/१, शनिवार पेठ, कन्याशाळेजवळ, पुणे ४११०३०
दूरभाष : (०२०) २४४८३०६२, भ्रमणभाष : ९८२३५४६०४२

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३४० एप्रिल ते जून २०१२

संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका








# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

कव्हर डिझाईन : **श्री. हेंमत सरदेसाई**

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : जून, २०१२

संपादकीय

# अमरकण्टकाची वाटचाल!

डॉ. मु. प्र. कुलकर्णी

व्याकूळ-आर्तता, उदासीन अपुरेपण, अनामिक कारुण्य, असह्य रितेपण, उदयाबरोबरच अस्ताचलीचे भय घेऊन येणारी संध्यामाई, गहिवरले हुंदके, अभंग-प्रार्थना, मंदिरातील आणि चर्चमधील त्रयस्थ घंटानाद, सार्थकाची निरर्थकात ओढ लावणारी मृगजळाची काहिली या सर्व संवेदनांच्या प्रतिमांचे लयबद्ध शब्दगारूड, शब्दचैतन्याच्या तपोवनातील तडफड...! या सर्व भावांवर मात करणाऱ्या, शाश्वत, संन्यस्त अभावांचे असे कल्लोळतीर्थ म्हणजे – ग्रेस!... अमरकंटकाच्या जंगलातून कोणत्याही क्षणी मृत्यूला सामोरे जावे लागेल अशी फकिरी परिक्रमा करणारे ग्रेस– 'अज्ञात झऱ्याचा शोध' घेण्यासाठी कविताभर व्याकूळ झाले!

कविता कोणतीही असो! कुणाचीही असो! शब्दांचा पांगुळगाडा घेऊन आणि जटायूच्या छाटलेल्या पंखांची तडफड घेऊन ती 'मुंगी होऊन सूर्याला गिळू पाहते!' ग्रेस यांच्या शब्दात बोलायचे तर हेच कवितेचे 'प्राक्तन' आहे! हीच तर कवितेची युगायुगांची शोकान्तिका आहे. भावांचे अभावग्रस्त होणे! मुंगीचा देह घेऊन 'लौकिकाच्या लाचार तुकड्याला' मन भुलले की, आदिम संघटनेशी त्याचे नाते तुटते! मग अभिव्यक्तीसाठी कवी भाषेसमोर केविलवाणा होतो. लाचार होतो. भावानुभूती पैलतीरावरून खुणावते. परंतु लौकिकाच्या फेऱ्यात सापडलेले मन भावानुभूतीपासून खूप दूर गेलेले असते. 'ओल्या रसरशीत वेळूला' बासरी व्हायचे असते! परंतु लौकिक सुखोपभोगाचे रसरशीतपणा हीच विसंवादी लय बासरीच्या भावकंठाशीच अडून बसते. कवितेच्या वैखरीचाच गळा धरल्यावर मुकुंदमुरलीचा सुरेल श्वास गुदमरणार नाही तर काय?

*'या वाटेवर रघुपति आहे, त्या वाटेवर शिळा*
*सांग साजणी कुठे ठेऊं मी, तुझा उमलता गळा?'*

ग्रेस यांची कविता अभावाचा सूर गाते! ओला वेळू शुष्क झाल्याशिवाय बासरी कशी होणार? दधीचि ऋषीच्या अस्थींना शुष्क झाल्यावरच वज्राचे बळ मिळाले! भाव आणि अभावांच्या तरल मार्गावर कविता आदिम भावनेचा शोध घेऊ पाहते. मृत्युलोकात या आदिमतेचा शोध कसा लागणार? जिथे पदोपदी अभावाचाच अनुभाव यतो. नव्हे अभावातच सार्थकता शोधणारा देह परिक्रमेचे दिव्य कसे करणार? ज्ञानदेवांनी या भावानुभावाच्या भयग्रस्त मायावी भूमीचे हृदयस्पर्शी वर्णन दृष्टांतमाध्यमातून केले आहे.

*जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी ।*
*जेथ उदयो होत अस्तालागी ॥*
*दुःख लेऊनि सुखाची आंगी ।*
*सळित जगाते ॥' अ. ९/५०२ ॥*

जिथे पौर्णिमेचा चंद्र क्षयरोगाने पछाडलेला आहे. जेथे सूर्य मावळण्याकरिता उगवतो; आणि जेथे दुःख हे सुखाचा भरजरी अंगरखा लेऊन समस्त लोकांना छळत असतो, जे प्राप्य नाही तेच असावेसे वाटते. असे सुखाचे इमले बांधत अंत-काळाकडे वाटचाल करणाऱ्याचे 'वडील' म्हणून सत्कार केले जातात. जन्मतःच अपंग माणूस पूर्णत्वाचा ध्यास घेतो. पांगुळल्या पायांनी क्षितिजाची मजल मारण्याचे स्वप्न पाहतो. आशा-आकांक्षाच्या, भास-आभासाच्या, पाप-पुण्याच्या भयाने आणि लौकिक-अलौकिकाच्या आवर्तामध्ये सापडून परिक्रमेची वाटचाल हरवून बसतो; आणि कलाकृतीचा पायाच विसरतो. कलानिर्मितीच्या वेळी, मग ती चित्रकला असो वा नृत्यकला... अथवा कोणतीही कला; ती देहबुद्धीची मरणकसोटीच असते! वाळवंटीय जळत्या उन्हाचे चित्र रेखाटतांना 'व्हॅन गॉग्' अनवाणी पायांनी वाळवंटाची जळती अनुभूती घेई. खऱ्या प्रेमाचा शोध घेताना त्याला केवळ वेश्यांनी आपलेसे केले. ग्रेस यांनी व्हिन्सेंट व्हॅन गॉग् चा वारंवार उल्लेख केला आहे. व्हॅन गॉग्ची चित्रकला

देहापलिकडच्या आदिमतेचा शोध घेणारी होती. कलाकृतीच्या निर्मितीचे भोग कुणालाही चुकले नाहीत. त्यातून पळवाटही काढता येत नाही. कोकिळेचे हुबेहुब चित्र काढणाऱ्या कुणा एका चित्रकर्तीची कलाकृती अप्रतीम होती; पण त्यात कोकिळेच्या कंठाचे 'भावरंग' ग्रेस यांना चुकूनही दिसले नाही. कोकिळेच्या पंचमसुरांचे भावरंग कुंचल्याने दाखविता येतील कां? नाही! म्हणून ग्रेस म्हणतात, 'कोकिळेचे चित्र रेखाटल्याचा-रंगविल्याचा खोटा दिलासा का द्यावा? ...आणि घेणाऱ्यानेही का घ्यावा?' पुढे ग्रेस- म्हणतात... 'प्रेषितांच्या या देवदत्त आशीर्वादाने' कलाकृतीतील 'अनुभवांचे संरक्षण तारण होऊ शकत नाही;' कारण कलाकृतीतील अनुभव ही अनुभवांची पुनर्निर्मिती असते... कलाकृतीचा आत्माच तारण ठेवून कसे चालेल! पुनर्निर्मितीतील भोग संतांच्या आशीर्वादाने किंवा दैवी स्पर्शानेही - टाळता येत नाहीत. संतांनाही ते टाळता आले नाहीत. कोकिळकंठातील पंचमस्वराचे दर्शन रंगवायला व्हॅन गॉग् सारखे अग्निदिव्य करावे लागते. कुणाच्या आयत्या आशीर्वादाने नाही! जीवनानुभवाच्या प्रक्रियेतून झिजताना कलावृत्तीची भाषा-सामग्री आणि तिची माध्यमे सोलली जात-जातच 'तीक्ष्णतेच्या मूळ गाभ्याकडे' जातात. यालाच ग्रेस 'मृगजळाचे बांधकाम' म्हणतात.

*'क्षितिज जसे दिसते, तशी म्हणावी गाणी ।*
*देहावरची त्वचा आंधळी, छिलून घ्यावी कोणी ॥'*

अथांग विस्तारलेला सागर आणि विश्वावर पांघरूण धरणारे आकाश यांच्या मीलनाचा भास म्हणजे क्षितिज! देहबुद्धीनेच हा दिव्य भास इंद्रियगम्य करण्याची सत्त्वपरीक्षा देताना शब्दाने, कुंचल्याने, छित्री हातोड्याने दर्शविताना-आंधळ्या देहाच्या पलिकडेच जावे लागते. अशाश्वतावर मात करून शाश्वताचे रंग भरावे लागतात. तेही भासप्रतिमांच्याच माध्यमातून!

राम-रावण युद्ध आणि अग्निदिव्यानंतर रामाने सीतेचा स्वीकार केला. सीतामाईने संतुष्ट होऊन हनुमंताला आपल्याकडील मौक्तिकमाळ दिली. हनुमंताने दातांनी चावून तपासली. पण त्यात त्याला 'राम' दिसला नाही! 'राम' ही हनुमंताची शुद्ध संवेदना! शुद्ध संवेदनेच्या तळाशी जायचे तर मौक्तिकांच्या अलंकरणात गुंतून पडणे अयोग्य! शब्दवास्तव! मग ते कितीही सुंदर आणि आनंददायी असो, ती कारागिरी वरवरचीच! परंतु अनुभूतीच्या ऊर्मीने अंगभूत लय-तालांची संघटना घेऊन प्रकटणारी रचना, स्वयंभू गणमात्रांचा पाठिंबा घेऊन प्रकटते!

*'जलद भरूनि आले ऐक माझी कहाणी'*

असे करुणाष्टकांचे आर्त घेऊन प्रकटणारे शब्दबंध नादविव्हळ होऊन भिडतात. संगीतकला आणि अक्षरगण, मात्रगणाची वृत्तकला ही प्रत्यक्ष संवेदना देते. ग्रेस यांच्या पदबंधात स्वप्न वास्तवाच्या मीलनाची संवेदना सहज स्वाभाविकपणे वृत्तबद्ध होऊन प्रकटली आहे. जसे हे 'मालिनी' वृत्त पहा-

*'भरभर जमती हे मेघ प्राणात दाटी ।*
*सहज लिहित जातो कोण कविता ललाटी ।'*

या इंद्रियनिष्ठ-शब्दनिष्ठ संवेदना रामदासांच्या करुणाष्टकातील आर्ततेशी नाते सांगतात - जसे -

*'जळत हृदय माझे जन्म कोट्यानुकोटी ।*
*मजवरी करुणेचा राघवा पूर लोटी ।'*

शब्दांची उत्स्फूर्त लय, अंगभूत संवेदना घेऊन येते. ग्रेस यांच्या रचनाबंधातील वृत्तबद्धता पंडितांची सनातनी नाही. रामदासांचे अष्टसात्त्विक भाव घेऊन ती येते. या अर्थाने ती युगायुगांच्या करूणेशी नाते जोडते. शब्दप्रतिमांच्या गारूडाने रसिकाला थांबवून ठेवते. नादावून टाकते! शब्दांचे नादलयीत विसर्जन होते. उरतो तो भाव आणि अभावही! ग्रेस म्हणतात-

शब्दांचे विसर्जन करून शुद्ध संवेदनेच्या मुळाशी जाण्याचा ध्यास घेणारी कविता गूढ अतार्किक रूपबंधातच व्यक्त होते. त्यावेळी ती स्वप्न आणि वास्तवाच्या सीमारेषेवर असते. अनामिक गूढता, अनामिक भय आणि वेदना; अनपेक्षितरित्या प्रश्नांकित होतात. जसा आवेग असेल तशा भाषामाध्यमातून -

*'उभी राने विकल विहगे ताल धरिती*
*जशी नक्षत्रांची फिकट किरणे दूर हलती*
*तुझ्या डोळ्यांचा मी सदय गिळला अश्रू पहिला*
*तरी माझ्या देही कुठून तव हा देह उरला?'*

हा भावावेग 'मालिनी' वृत्तातील आहे. तसे पुढील रचनावेग 'ओवी'बद्ध झाला आहे-

*'सांजभयातही । नदी ओणावते;*
*गवताचे पाते । जपूनिया ॥*

*भांबावतो जेव्हा । अंकुराचा पोत;*
*तेव्हा माझा हात । सोडू नये...'*

आणि पुढील रचना 'भुजंगप्रयात'मधील आहे.

*कवितेत अर्थांतरन्यास जेव्हा,*
*प्रभूच्या दयेतूनही कोसळे*
*या संहितेला नवे शील द्यावा,*
*पुन्हा धाड तू वाळवीची कुळे...!*

प्रासयुक्तता आणि नादमयता शुद्ध संवेदनांसह इंद्रियगम्य होते. त्यातील द्वैती उलघाल रसिकांना झपाटून टाकते. ग्रेस यांच्या जाण्याने कवितेतील युगायुगांची अस्वस्थ उलघाल त्यांच्यापुरती थांबली असली तरी हजारो रसिकांना या कवितेने अक्षरश: वेड लावले आहे. हे झपाटलेपण उरात घेऊनच रसिकही ग्रेस यांच्याबरोबर अमरकंटकाची न संपणारी परिक्रमा करीत राहतील! भाव-अभावाच्या कल्लोळात सुस्नात होत राहतील. भावास्थितीनंतरची अनुभावावस्था अभावाचे प्रश्न विचारतच राहील. केशवसुत गेल्यानंतर गडकऱ्यांनी म्हटले होते – 'केशवसुत कसले गेले?... केशवसुत गातचि बसले' ग्रेस मात्र अमरकंटकाच्या जंगलात रक्तबंबाळ अश्वत्थाम्याची जखम घेऊन अभावाचे गाणे रसिकांच्या मनात गातच राहतील.

कवि ग्रेस अद्वैतत्व नाकारतात. द्वैतातील आस, अस्थाई आणि अंतराच्या जीवघेण्या समांतर प्रवासात 'त्या'चा शब्द स्पर्श, नाद, लय, ताल, रस, गंध रूप यांच्या क्षणभराच्या का होईना, ओझरत्या साक्षात्काराला जपणे; आणि त्यासाठी पुन:पुन्हा जिवाला ओढ लावून घेणे; ह्या अपुरेणातच कवितेची सार्थकता आहे. पूर्णत्व ही एक स्वप्नभूमी आहे. तिच्या प्राप्तीसाठी रामायण-महाभारत झाले; तेही मायावी कांचनमृगामुळे आणि फसव्या मयसभेमुळेच! एखाद्या गोष्टीचे किंवा वस्तूचे असणे म्हणजे 'भाव' आणि नसण्यात असण्याचा भास म्हणजे अभाव! भावाचे उत्कट दर्शन अभावग्रस्ततेतूनच होते. ग्रेस यांची कविता भाव आणि अभावाच्या तरल भासप्रतिमांनी प्रेरित झालेली आहे. म्हणूनच ती गूढ भासप्रतिमांनीयुक्त आणि पूर्णतेच्या मार्गावरील अस्वस्थतेची आहे. बालरामाने चंद्रासाठी हट्ट धरला होता. त्याला आरशातील चंद्रबिंब दाखविल्यावर त्याचे रडे थांबले; अशी कथा सांगितली जाते. चंद्र दिसत असूनही त्याच्या दूरत्वाने राम रडू लागला! भासप्रतिमेने त्याचे समाधान झाले! भासप्रतिमांच्या मार्गावरचे समाधान! हे युगायुगांचे अपूर्णत्व काव्याला आणि महाकाव्यालाही आवाहन करीत आले आहेत. सूर्योदय-सूर्यास्त हे भासच आहेत. अनुभूतीची पुनर्निर्मिती करणारे!

भासप्रतिमा कितीही अभावग्रस्त असल्या; तरी त्या सत्यवस्तूच्या असण्याच्या साक्षीदार असतात. कायद्याच्या भाषेत तो सत्याचा एक पुरावाच मानला जातो. (Secondary evidence) साहित्यात भाससत्य हा साहित्याचा प्राण! पहाटेचे रंग, इंद्रधनुष्यातील सप्तरंग, संध्याकाळची अपूर्व रंगांची उधळण, चांदण्याची पखरण, अमावास्येचे नक्षत्रांकित आकाश, सूर्योदय आणि सूर्यास्त या सर्व आभासाच्याच किमया असल्या तरी सूर्य-चंद्राच्या अस्तित्वाचेच ते दर्शनशास्त्र आहे. त्याला भासमय-खोटे म्हणून कसे चालेल! सूर्य हेच या आभासाच्या दुनियेचे प्राणतत्त्व आहे. या प्राणतत्त्वाची ओळख आभासाच्या मायाजालातूनच होते. आदिम प्राणतत्त्वाची ओळख करून घ्यायची तर ह्या आदिम मायाजालालाही चुकवून चालणार नाही. अनुभूतीच्या-पुनर्निर्मितीची मायावी काव्यवाट आणि काव्यघाट हीच कविता! ग्रेस यांच्या कवितेची वाटचाल सोपी नाही. शब्द मरणाच्या न संपणाऱ्या भयभावनेचा तिला शाप आहे. अमरकण्टकाची शापित वाटचाल हेच कवितेचे प्राक्तन! बुडतो तो घट. भरते ते जीवन! शब्दांचे विसर्जन आणि काव्याचा साक्षात्कार! देहबुद्धीचे मरण झाल्याशिवाय कवितेला मुक्ती नाही. ही जीवनमृत्यूची एकाच वेळी होणारी भेट! क्षितिजाच्या आभासमय सीमारेषेवर

*'.... बुडता-बुडता सांजप्रवाही*
*अलगद भरुनी जावे...!"*

संपादक

महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९



अनुक्रमणिका

# 'ग्रेस'फुल अब्सर्डिटी

– प्राचार्य पद्‌माकर पुंडे

*[कवि ग्रेस यांच्या कवितेच्या निमित्ताने...]*

विसाव्या शतकात साहित्यात अनेक नवीन प्रवाह आले. यातीलच एक वेगळा प्रवाह म्हणजे अब्सर्ड लिटरेचर किंवा थिएटर ऑफ द अब्सर्ड. हा प्रवाह म्हणजे एक नवीन शैली असून, या avant-garde शैलीत रचनेचे तंत्र (structure), संविधानक (plot), पात्रयोजना (Characterization) यासारख्या तांत्रिक बाबींकडे दुर्लक्ष केले जाते. लेखन प्रकार तंत्राबाबत मार्क शोअरर याने Technique as Discovery या लेखात म्हटले आहे, "The difference between content or experience and achieved content or art is technique." परंतु काही साहित्यिकांच्या मते तांत्रिक बाबी किंवा लेखनतंत्र या गोष्टींना अजिबात महत्त्व नाही. त्यांच्या मते एकूणच निसर्गात तर्कसंगतीचा अभाव आहे. या विश्वात माणसाचे एकाकीपण, अलगपण प्रकर्षाने जाणवणारे असून, अस्तित्व निरर्थक व मूल्यशून्य आहे. जिथे वास्तवात अतार्किक, निरर्थक, निरूपयोगी गोष्टींचा भरणा आहे तिथे साहित्यिकाच्या व्यक्तिकरणात तर्कसुसंगती कशी येणार? म्हणून content अर्थात साहित्यनिर्मितीत technique अर्थात तंत्राची मर्यादा आवश्यक नाही व यासाठी साहित्यनिर्मितीच्या तांत्रिक बाबींकडे दुर्लक्ष केले जाते; अथवा त्यांची सरमिसळ होते. अतार्किक व विसंगत विश्वात माणसाचे एकाकीपण व अलगत्व व्यक्त करण्यासाठी तंत्रशुद्धतेची चौकट झुगारण्यातच पुरोगामित्व दिसून येते.

Absured या शब्दाची व्युत्पत्ती लॅटिन absurdus या शब्दापासून झाली आहे. ab म्हणजे deaf व surdus म्हणजे stupid असा absurdus शब्द बनलेला आहे. तंत्रासाठी निष्कर्ष (deaf) व आशयासाठी असंबंद्ध (stupid) म्हणजे अतार्किक व सामंजस्याचा, तर्कशुद्धतेचा (Logic) अभाव असलेले लेखन हे absurd Literature आहे. अल्बर्ट कामूने आपली अस्तित्ववादाची संकल्पना व मुक्त इच्छेचे तत्त्वज्ञान स्पष्ट करण्यासाठी हा शब्द वापरलेला आहे. आपले चूक की बरोबर हे न समजता व्यक्ती आपले निर्णय घेत असते. कोणत्याही निर्णयासाठी ती व्यक्ती स्वत: जबाबदार असते हे तत्त्वज्ञान कामूच्या The stranger या कादंबरीत दिसते. या कादंबरीतील मुख्य पात्र (protagonist) घटनेचे गांभीर्य व परिणाम न समजता खून करते. यात आपल्या कृतीचे घटनापूर्व मूल्यमापन किंवा काही चूक झाल्याचा, घटनांनंतर पश्चात्ताप या गोष्टींचा विचार नाही. अशाप्रकारे जगणे म्हणजे absurd किंवा असमंजसपणा, अतार्किकता असून, सारासार विवेकाच्या विरुद्ध असते. जिथे वास्तवात, भोवतालच्या विश्वात तर्कसंगती नाही, तिथे साहित्यात सुसंगती कोठून येणार? सारेच निरर्थक, विसंगत, अतार्किक व शून्यवत् आहे, तेच शब्दांत प्रकटणार. आधुनिक जीवन या अब्सर्डिटीने भरलेले आहे. या जगात माणसाची धार्मिक, तात्त्विक व सांस्कृतिक पाळेमुळे उद्ध्वस्त झाली आहेत. विश्वात 'माणूस' अलग, एकाकी झाला आहे. इतर माणसे व इतर गोष्टी यांच्या गर्दीत असूनही हे एकाकीपण त्याला गोंधळवते, घाबरवते अन् 'भय इथले संपत नाही' अशी अवस्था झाली आहे. हे वास्तववादी चित्र व्यक्त करणारे साहित्य, विशेषत: नाटक, आजच्या काळात प्रभावी झाले आहे. या गोंधळवून टाकणाऱ्या विश्वात एकाकी, भयग्रस्त व्यक्तीचे चित्रण येणे स्वाभाविक आहे. आधुनिक जगातील माणसाच्या एकूण स्थितीच्या 'अवसिर्डिटीचे' चित्रण 'अब्सर्ड' शैलीतच करता येते अशी या प्रवाहातील साहित्यिकांची



अनुक्रमणिका

धारणा असते. या शैलीबरोबरच विषयातही (content) हे वैचित्र्य किंवा विलक्षणता दिसून येते. या साहित्यकृतीत कथानक (plot) संवाद (dialogne), पात्रयोजना (characterization) इत्यादी पारंपरिक घटकांचे जाणीवपूर्वक उल्लंघन केले जाते. यातील दृश्ये, घटना, संवाद इत्यादींची सरमिसळ केली जाते, या गोष्टी पुनरावृत्त होतात व जाणीवपूर्वक त्यांना अतार्किक, विसंगत स्वरूपात ठेवले जाते. यातील वैचित्र्यपूर्ण शोकात्मकता वगळली तर ही साहित्यकृती विनोदी होऊ शकते. या प्रकारच्या साहित्यकृतींचा उद्‌गम सुप्तमनोविष्कार (surrealism) व व्यक्तिकरण (expressionism) या साहित्यप्रवाहातून झाला असून, फ्रॅन्झ काफका याचा यावर प्रभाव आहे. १९४०च्या दरम्यान फ्रान्समध्ये जीन पॉल सार्त्र व अल्बर्ट कामू यांच्या लेखनातून हा प्रकार प्रभावीपणे आला आहे. सॅम्युएल बेकेटचे 'वेटिंग फॉर गोदो' हे नाटक या साहित्यप्रकाराचे परिपूर्ण उदाहरण आहे. या प्रवाहाचा प्रभाव ग्रेस यांच्या काव्यावर दिसून येतो. एकूणच सृष्टीतील गहनता, औदासिन्य व यातील माणसाचा एकाकीपणा, दु:ख, वेदना यांचे प्रभावी व्यक्तिकरण व चित्रण यांच्या संध्याकाळच्या कवितांमध्ये झाले आहे.

*गेले उकरून घर*
*जाऊ धुक्यांत माघारा*
*कधी पुरून ठेवल्या*
*आणू सोन्याच्या मोहरा*

एकूणच वास्तवाचे विस्कटलेपण, विसंगती व त्यात सुखाची वेदना काळजाला भिडते.

*कधी पांघरावे मीहि*
*माझ्या रक्ताचे प्रपात*
*गूढ घावांचे किनारे*
*मीच तोडावे वेगांत*

काव्यरचनेची फारशी तोडफोड न करता वैश्विक आव्हानांचा वैयक्तिक पातळीवर सामना करण्याची ऊर्मी व हतबलतेने आलेली दु:खाची वेदना ही अवसर्डिटीच्या पातळीवर व्यक्त झालेली भावना खरेतर 'ग्रेसफुल अवसर्डिटी'च म्हणावी लागेल.

*नाहीच कुणी अपुलें रे*
*प्राणांवर नभ धरणारें*
*दिक्काल धुक्याच्या वेळीं*
*हृदयाला स्पंदविणारें...*

सभोवतालच्या चक्रावणाऱ्या धुक्याच्यावेळी आलेले एकाकीपण, विस्कटलेल्या विश्वात आलेली हतबलता, एकूणच या आधुनिक जगात व्यक्तीचे हरवलेले अस्तित्व, हतबलता, या सर्व गोष्टी प्रभावीपणे मांडणारी अव्सर्डिटी खरेतर वास्तववादी चित्रण आहे. वास्तवाची ही संवेदना व त्यातून आलेली वेदना deaf व stupid म्हणता येणार नाही; तर ही तगमग वाचकाला भिडणारी, अस्वस्थ करणारी आणि म्हणूनच प्रभावी आहे. दु:खाच्या वैभवात 'माणूस' पोरका होतो–

*अशा दिशा हरवतात आणि अशा*
*दिशा उगवतात.*
*मनाचे सर्व आभास दु:खाच्या एवढ्या*
*समर्थ वैभवांतही असतात*
*पराधीन, पोरके आणि सर्वस्वी*
*अनाथ.*

विस्कळीत समाज व विस्थापित व्यक्ती या भयकारी संघर्षातून 'शेवटच्या' सत्याची जाणीव होते–

....... या बेवारशी डोळ्यांना

असेच सोडून जावे या पुस्तकांच्या सांगाती; तसे यांचे पुढे कोण आहे? मी जसा बर्फातून आलो तसाच बर्फातून जाईन; रात्रीच्या शेवटच्या प्रहरांतील रहदारीसारखा!

◇◇◇

**प्राचार्य पद्माकर पुंडे**
साईदत्त रेसिडेन्सी,
मेनरोड, बाणेर, पुणे ४११०४५
(९८२२३९८१९४)





अनुक्रमणिका

आत्म्यातल्यां काळोखाचे शब्द :

# 'कावळे उडाले स्वामी'

– डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार

आपल्याच अंतर्मनातील अंधाऱ्या गुहा शोधणाऱ्या प्रतिभावंतांची जातकुळीच वेगळी असते. स्वतंत्र असा लेखनधर्म आणि भावनांची घुसमट व्यक्त करताना ही घालमेलही तितकीच प्रत्ययकारी व्यक्त होत असते. त्यांच्या अत्यंत स्तिमित करणारी ललितबंधाची भाषा वाचकमनाला खिळवून ठेवते. कविता गद्यमय होणे; आणि निबंध पद्यमय होणे, ही जणू त्यांच्या लेखनाची समृद्धताच आहे. 'संध्याकाळच्या कविता'पासून ते 'सांजभयाच्या साजणी'पर्यंतचा काव्यप्रवास असो, की 'चर्चबेल' पासून 'कावळे उडाले स्वामी'पर्यंतच्या ललितबंधाचा प्रवास असो, अनुभवविश्वाची उत्कटता आणि तरलता पहायला मिळते. 'वाऱ्याने हलते रान' म्हणजे शब्द आणि स्वप्नबांधणीतील घाव व्यक्त करणारे शिलालेखच आहेत, ज्यांचा गौरव नुकताच 'साहित्य अकादमी' पुरस्काराने झाला. 'कावळे उडाले स्वामी...' हा त्यांचा नंतरचा ललितबंधाचा संग्रह होय.

प्रतिमांच्या जगात वावरताना भावनांची दीर्घ खोली व्यक्त होते. चांदी मोडीत काढून सोन्याचे दान मागू नये; कारण सोने ते सोनेच राहते आणि चांदी ही चांदीच असते. ऊर फुटून मांडली जाणारी अस्तित्वाची भीती आणि त्याचाही कुठेच ठावठिकाणा नसावा असे संभ्रमाचे भावबिलोरी रूप या ललितबंधातून जाणवते. मोराचे पंखझडीचे दिवस, मोरांचे टाहो फुटणारे काळजाचे रूप, संध्याराग, झोपाळा, रिकामी पडवी, जमिनीवर सांडणारा मोरांचा पिसारा या सगळ्यातून सरकत जाणाऱ्या आपल्याच पावलांचा अस्वस्थ आवाज कसा ऐकतो आपण? हा सगळाच काळीज गोंदणातला गोंधळ आहे. हिवाळ्यातल्या संध्याकाळी आकाशच चोरीला जावं आणि आपल्या भोवतालचा गल्लीबोळ पुन्हा एकदा उदासीच्या सुरांनी भरून राहावा, मग पुन्हा आकांताची खोलवरची आपलीच जगण्याची लय शोधावी; असे सगळे चित्र! ग्रेसांची ललितबंधाची लेखनशैली म्हणजे अवलिया कलावंताची एक अनुभूतीच आहे. कुठलाही कलावंत जगतो कसा? याचे उत्तरही तेच देतात, 'कलावंत अनुभूतीची केवळ मखरमांडणी करीत नाही, अस्सल कलावंत मांडणीच्या वेळी लाच, नजराणे तर सोडाच पण दाव्या-प्रतिदाव्यांची भाषाही वापरत नाही. तो असले 'चवचाल कूळ' उपटून काढण्याच्या पूर्वी, पहिल्या वधास लागणाऱ्या आपल्या काळजाचा अंतस्थ हुंदका, पवित्र मंत्रोच्चाराप्रमाणे ऐकण्याचा प्रयत्न करतो. अनुभूतीचा मूळ स्वभाव, तिची तीव्रता आणि उत्कटता थोडीशीही गमवायची नाही, पण त्याबरोबरच तिच्या कलासंपन्न उन्नयनांचा सच्चा निर्मितीमार्गही अधोरेखित करीत जायचे. परंतु रसिकतेच्या प्रत्येक पातळीला मिळणारे, हे काळीजमंत्र, प्रत्येक रसिक आपल्या कुवतीप्रमाणे स्वीकारीत असतो.' (पृष्ठ २४) ही कवी ग्रेस यांच्यासारख्या कलावंताची कलावंताबद्दलची धारणा आहे.

ग्रेस यांचा मूलत: स्वभावधर्म कवीचा. कवीचे प्रतिमांकित जग खूप वेगळे असते. पैलतीरावरचा विठू आपली शाळा सांभाळतो, ही एक श्रद्धा आहे. संध्यामाईच्या पणतीची तडतड, गाईचा रडवेला शोक, अनाकलनीय असा रिल्केच्या निर्मितीवधाचा धांडोळा, वैशाखाचा वणवा, निवाऱ्याचा दिलासा असणारी पडवी, माणसाच्या नेणिवेचा प्रदेश, या सगळ्यात ग्रेस यांची विचारांची एक गुंतागुंत आहे; जी सहजपणे उमगत नाही. नाजूक भावना, शब्दांचा स्पर्श यातून

कलावंताची लेखणी साकारत असते. ग्रेस यांची लेखनशैलीतली मोठी ताकद या ललितबंधांच्यामधून पुन्हा पुन्हा प्रत्ययाला येते. सहजपणे लेखनात उतरणारे पाश्चात्य लेखकांचे संदर्भ, संतांच्या लेखनाचा आविष्कार मोरापासून वाऱ्यापर्यंतचे प्रतिमांचे जग. यात ललित्याची भाषा अवतरते. शब्द आणि प्रतिमांच्या रूपातून दिलेले आर्तरूप म्हणजे हे मूर्त असे ललितलेखन होय.

ग्रेस आपल्या लेखनांतून स्वत:ला अंतर्बाह्य सोलून व्यक्त करतात. आत्मशोधाच्या डोहात उडी मारल्यावर त्यातून निर्मिती क्षमतेची विविधताच जणू व्यक्त होत असते. या ललितबंधांचे वाचणे म्हणे अनुभूतीच्या तरलतेची कविताच वाचणे होय. कवितेच्या मुळाशी शिरून अर्थबोधाच्या जाणिवांना आपण शोधतो, किंबहुना अशी गूढता उकलण्याच्या नादात आपण वाचक स्वत:लाच हरवतो. 'कावळे उडाले स्वामी' मधील अशी कित्येक अवतरणे याची साक्ष देतात. उदा.

१. 'साऊलच्या निर्मितीविश्वाच्या काठावर विसावण्यापूर्वी मला जर तिच्या अलंकारशाळेतील मणिबंधाचा शोध लागला असता, तर माझ्या निर्मितीविश्वातून दुसऱ्याच प्रकारचे, दुखरे काम निर्माण झाले असते. कलावंताची अलंकारशाळा, अलंकारशाळेतील मणिबंध, हे त्याच्या निर्मितीविश्वातील उपरे घटक नसतात, तर ते निर्मितीच्या सीमांत तरलतेला सतत तोलून धरणारे, रंगप्रकार विश्वाचे लयबद्ध तोलक आणि तारक असतात.' (पृष्ठ ९)

२. 'आता अंधारसावल्यांनी संधिकालाचा हात हळूच सोडला आहे. उद्‌गारवेगांची, उच्चारतोलांची, सर्व शब्दांची हिम्मत थकून थकून जितकी कनवाळू तितकीच मायाळूही झाली आहे. एक तर आपण मायाळू असतो, दयाळू असतो, कनवाळू असतो. पण कनवाळू मायाळू द्विरुक्तीत. आपले प्राण काही काळ थरथरत्या अवस्थेत सांभाळू शकलो, तर शब्दविरामांच्या नाही, तर शब्द विसर्जनांच्या खोलखोल डोहांची हाक आपल्याला ऐकू येते.' (पृ. ३१)

३. 'तुम्ही आरशाला पाठमोरे झालात, तर आरसा तुमच्या दर्शनी भागाला आडोशाला ठेवतो. म्हणून कलावंताला आपल्या प्रतिभाव्यापारात आत्यंतिक प्रामाणिक असलेल्या या आरशांची मोडतोड करावी लागते; आणि या मोडतोडीसाठी बाहेरून जमविलेल्या दगडांचा उपयोग करता येत नाही, तर त्याच्या भावविश्वातील दीपकलिकांच्या हुंकारांची चिरेदगड घेऊन त्याची मोडतोड त्याला करावी लागते. तेव्हाच आरशाच्या प्रामाणिक भावांचे रुपांतर कलावंतांच्या स्वनिर्मित कृतज्ञ आरशांच्या बिल्लोरी दर्पणात होत असते; आणि मग संतापाने किंवा सात्विकतेने अस्सा हंबरडा फोडता येतो- All the mirrors have been shttered by the dashings of the grotesque images, still I have not given up the mission of polishing the sky... (पृ. ७५)

वरील तिन्ही अवतरणे विविधतेची रूपे आहेत. निर्मितीविश्वाचे दीर्घरूप, अंधारातली खेळ, डोहांची हाक आणि आरशाचे बिल्लोरी रूप अशा तीन पातळीवर ही अवतरणे काही संकेत मांडतात. आत्म्यातल्या स्वत:चा वावर कसा व्यक्त होतो? जीवाची घालमेल कशाने होते? कुठचे आणि कशाचे हे संकेत?

*'आत्म्यातला गुप्त काळोखही*
*स्पष्ट स्फटिकांप्रमाणे इथे वावरे;*
*काव्यास त्याच्या पडे प्रश्न व्याकुळ*
*बहराविना जीव का पाझरे?'- पृष्ठ ७५*

अशा प्रश्नांचा गुंता सोडवतच कवींचे पसरणे असते. बदकांच्या पायातले स्वस्तिक शोधत प्रवास करणाऱ्याचे मन, चांदण्यातही चांदणीचे स्फुंदणारे एक रूप, स्पर्धक म्हणून स्वत:च स्वत:चा पाठलाग करणे, कलावंतानेच कलेची आराधना करणे व त्यातून सृजनशील निर्मितीचे स्वत:साठीचे स्वत:कडूनच बक्षीस प्राप्त करणे, ही अस्सल कलावंताची एक खूण असते. कलावंताची अनुभूती म्हणजे हवेच्या तुकड्याने वाजणाऱ्या शिवालयातील घंटानादासारखे असते. ही व्यापकता खूप बोलकी आहे. 'चंद्रउदयिनी वेळा' आणि 'गणमात्रांचे गणगोत' या दोन विभागात





अनुक्रमणिका

हे लेख आहेत. 'काजळसंध्येतील कजरीचा कौल' किंवा 'उदासमंत्रांची पडशाळा' या लेखनात निर्मितीशील अनुभवांची बांधणी आहे. यात चिमण्यांना दाणे टाकणाऱ्या सृजनशील हातांची चिमुकली कथा आहे, तशी नैसर्गिक उत्पातांनी मानवतेच्या मनात भेदरणाऱ्या भयाची संभावनाही आहे. शब्द-भाषा-आशय-विचार यांना घेऊन आत्मगत दुःखाला अधोरेखित करणारी विचारप्रणाली आहे. संवेदनेचा प्रांत आहे, मनांचा डोह आहे, भावनांच्या खोलीबरोबर कृतज्ञतेचे आकलन आणि निरंतराच्या दिशेचा प्रवास आहे. ग्रेस यांचे ललितबंध वाचणे म्हणजे देशांतराच्या वाटेवरची कावळ्यांची दिशा शोधणे आहे; वाऱ्याचा माग शोधताना गळालेल्या पक्ष्यांची पिसे गोळा करत हुंदडणे आहे आणि मनाच्याही अंतर्मनातली एक शोधयात्रा आहे.

◇◇◇

**'कावळे उडाली स्वामी' ग्रेस : ललितबंध**
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
प्रथमावृत्ती २०१०
पृष्ठे-
मूल्य रु. ३४५/-

**डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार**
मराठी विभाग,
यशवंतराव चव्हाण महाविद्यालय, हलकर्णी, चंदगड, कोल्हापूर
निवास
मु. पो. मजरे कार्वे, चंदगड, कोल्हापूर ४१६५०७





अनुक्रमणिका






# अलविदा!
## प्रिय ग्रेस,

– माधवी वैद्य

तुम्ही गेलात! पण मराठी कवितेला पोरके करून गेलात! मनाला रिक्ततेचा, सुन्नतेचा अनुभव देऊन गेलात! जेव्हा तुम्हाला कॅन्सरसारख्या दुर्धर रोगानं गाठलं तेव्हाच आता त्याचे पुढील परिणाम काय होणार हे न कळण्यासारखं त्यात काहीच नव्हतं... हे मृत्यू कधीतरी तुम्हाला गाठणार हे निश्चितच होतं... आणि या अटळ मृत्यूला कवेत घेताना दाखवलेली तुमची निर्भीड वृत्तीही मनात कुठेतरी गोंदली जात होती. अगदी अशक्त, कृश झालेली तुमची काया हॉस्पिटलमध्ये गेलो तरीही आर्जवी, लाघवी आणि आत्मीयतेनं केलेले संवाद, अगदी चहा-पाण्याची केलेली विचारपूस, आजही सारं जसंच्या तसं आठवतं आहे. शरीर कृश होत होतं; पण डोळ्यांतले भाव मला अधिक गहिरे, खेळ झाल्यासारखे भासत होते. स्वत:लाच खोलवर शोधण्याचा त्यांचा प्रयत्न त्या नजरेतून स्पष्ट साकारत होता. 'ये मृत्यो ये!' म्हणायला अधीर झाल्यासारखे तुमचे ओठ अधिकच काही बोलण्यासाठी उत्सुक आहेत असं वाटत होतं. कदाचित आम्ही धास्तावलेल्या मनानी तुमची विचारपूस करायला आल्यावर कदाचित तुम्ही नजर अधिकच खोल नेऊन तुम्ही आम्हाला सांगाल...

*कुणि चिता रचा हो माझी!*
*वर चांदणं, चंदन शिपडा*
*अन् शीतल करुनी मजला*
*मायेनं माहेर घडवा...*

खरंच! जेव्हा जेव्हा तुम्हाला बघितलं तेव्हा तेव्हा एखादं मूल काहीतरी हरवलेली वस्तू सापडवण्यात गुंतलेलं असावं किंवा व्यक्त खूप करायचं आहे, पण बोलायचं कसं? या विचारात मग्न असावं... असेच दिसायचात. जे हरवलं आहे ते सापडण्यातली मनस्विता कधी अनुभवायचात, जे हरवलं आहे ते सापडत नाही म्हणून हाती आलेली विफलता, विव्हळता तुम्ही अनुभवयचात. कधी उद्विग्न, कधी निराश, कधी निर्मितिप्रक्रियेच्या दडपणाखाली वावरणारे दिसायचात. 'भय इथले संपत नाही' म्हणून भयगंडाने पछाडलेले असायचात, किती रूपं, मनस्वी रूपं डोळ्यांसमोर आजही येतात! आणि यातलं प्रत्येक रूपच निखळ, प्रामाणिक भासत राहातं! मी ही सर्व रूपं पाहात होते आणि थक्क होत होते; कारण या जगण्यांचा खोट्या बाजाराइतका अस्सल कलावंत बघण्याची, त्याला भेटण्याची आणि त्याच्यावर काही निर्मिती करण्याची संधी आजकाल विरळच येत असते ना!

*क्षितिज जसे दिसते*
*तशी म्हणावी गाणी*
*देहावरची त्वचा आंधळी*
*छिलून घ्यावी कोणी ।*
*गाय जशी हंबरते*
*तसेच व्याकुळ व्हावे*
*बुडता बुडता सांजप्रवाही*
*अलगद भरुनी यावे ।।*

या तुमच्या 'संध्याकाळच्या कविता' या कविता संग्रहातील ओळी मनात पार घुसल्या होत्या. आपल्या कवितांतून 'संध्यापर्व'चे दीर्घ पालाण आळवणारा हा कवी, थकलेले घर, घनघोर अंधार, तुमच्या कवितेतून येणारी आईची विलक्षण प्रतिमा, एकांत, 'सायलेन्स'चं



अनुक्रमणिका

भान, सारंच विलक्षण! आम्ही जे रोज शब्द वापरतो तेच शब्द तुमच्या कवितेत वाचले की तुमच्या प्रतिभेची झळाळी त्यांना मिळायची आणि मनात वीज चमकून जावी असं वाटायचं. तुमची प्रतीकं, प्रतिमाविश्व, शब्दकळा, नाद, नादामागची वलयं यांनी मनात घर केलं जायचं. मग ती कविता मनात घुमायला लागायची आणि रसिक त्यानं पुरता पछाडला जायचा. असं पछाडलेपण पूर्वी अनुभवलं होतं. 'आरती प्रभूंची कविता वाचताना. दोघेही दु:खाचा शोध घेणारे महाकवी. 'मी महाकवी दु:खाचा, प्राचीन नदीपरी खोल' असं तुम्हीच तर म्हटलं आहे स्वत:विषयी. पण तुमच्या कविता वाचताना 'आरती प्रभूंनी' घातलेला धाक मनात सतत जागता असायचा. 'या माझ्या कवितेच्या वाट्याला जाऊ नका. कारण त्या आहेत तिच्या नागमोडी स्वभावातून स्फुरलेल्या. मोडून पडाल! तिला पाहायचे डोळे प्रथम मिळवा आणि मग पाहा तिच्याकडे डोळे वर करून! ती भोगतेय जे जे काही, त्याच्यातल्या तिळमात्रही वेदना तुम्हाला सोसायच्या नाहीत.' आरती प्रभू आणि जी.ए. कुलकर्णी हे तुमच्या मनाचे हळवे कोपरे. जी.एं.ची आणि तुमची मैत्रीही जगा वेगळीच. समोरासमोर प्रत्यक्षात आलो तर... आणि त्या वास्तवानी आपल्या दोघांच्या मनात जपलेल्या आपल्या प्रतिमांना तडा गेला तर... म्हणून समोरच यायला नको." म्हणून ठरलेली भेटही रद्द करण्याची तुमची मनस्वी वृत्ती! या मनस्वी वृत्तीचा अनुभवही दाहकच होता! 'कवी शब्दांचे ईश्वर' या मालिकेतील आपल्यावरील भागाचं चित्रीकरण करताना तुमची मनस्विता, अस्वस्थता, प्रामाणिकपणा, आत्ममग्नता, डिप्रेशन यांचा फार जवळून अनुभव घेता आला. तुम्ही गेलात पण त्या आठवणी मनात जाग्या आहेत. निर्मितिनाशाचं भय तुमच्या मनात सतत जागतं असायचं. अशा कलावंताला कॅमेऱ्यात घेणं हे एक आव्हान होतं माझ्या दृष्टीनं. आधी ग्रेसची कविता वाचायची, समजून घ्यायची, मग ग्रेसला त्याच्या स्वभावाच्या खाचा-खोचांसकट समजून घ्यायचं आणि मग त्याला आपल्याला हवा तसा आपल्या कॅमेऱ्यातून प्रोजेक्ट करायचं ही गोष्ट अजिबात सोपी नव्हती. आणि हा काळही तुम्ही जेव्हा 'नॉर्मल स्कूल क्वॉर्टर्स' आपल्या घरात, आपल्या कोशात राहात होतात तेव्हाचा काळ होता. त्या काळात तुमच्या घराची कवाडं अधिक बंद होती, ती कधी कधीतरी किलकिली केली जायची, येणाऱ्याचं भाग्य असेल तर! नाहीतर तुम्हीच त्याच्या प्रश्नाला उत्तर द्यायचात, "ग्रेस घरी नाहीत." अशा कथा तंर खूपच कानावर येत होत्या. मन धास्तावून गेलं होतं; आम्हाला तुम्ही कशी ट्रिटमेंट द्याल म्हणून. पण अनुभव आला निराळाच. तुम्ही दार उघडलंत. नुसतं उघडलं नाहीत तर सर्व विचारपूस आस्थेनं केलीत. प्रकल्प आवडल्याची पावती आणि वर गरम गरम वाफाळलेला, तुमच्या हातचा चहाही मिळाला! वा! धन्य वाटलं... खरोखरीच एखाद्या वारकऱ्याला पंढरपूरचा विठोबा भेटल्यावर जो आनंद आणि समाधान मिळेल, तसंच वाटलं. सर्व प्रकल्पाच्या भागाची आखणी करून पुण्याला परतलो. परतताना तुमचं तुमच्या कवितेबद्दलचं विवरण कानात घुमत होतं. 'मी परंपरावादी आहे... मी प्रार्थनावादीही आहे. संध्याकालीन समयांचे दीर्घ पालन माझ्या कवितेत मी पांघरलं आहे. जीवनसत्ता, निसर्गसत्ता आणि सौंदर्यसत्ता या तीन सार्वभौम सत्ता आहेत असं मी मानतो..." चित्रीकरणाची तारीख ठरली; आणि तुमच्या मला येणाऱ्या फोनची संख्याही वाढली. फोनची वेळ अगदी सकाळी, सकाळी ५॥ ते ६ च्या दरम्यानची. खोल गेलेला आवाज. "मी पूर्णत: उद्विग्न अवस्थेत आहे. येऊ नका. डीप डीप्रेशन आहे. एक वाक्यही बोलता येण्याची शक्यता नाही. कदाचित् आल्या पावलीच परत जावं लागेल. प्रार्थना करा." माझ्याही

समोर एकच आव्हान तुम्ही कळतनकळत ठेवलं होतंत की हात हलवत परत न येणं! मी चक्क खरोखरीच दगडू हलवाईसमोर नारळ फोडून नागपूरला आणि तोच नारळ प्रसादस्वरूप अत्यंत प्रामाणिकपणे आणि मनस्वीपणे देखील, तुमच्या देवघरात तुमच्या ओंजळीत ठेवला आणि प्रार्थनावाद प्रार्थनावाद म्हणजे काय असतो याचा साक्षात्कार झाला. ग्रेसचे सारे डिप्रेशन गेले आणि सर्व शूटिंग एकही रीटेक न होता निर्विघ्नपणे पार पडलं!... त्याचं फलित म्हणजे 'सांध्यपर्व.' ग्रेसवरचा तुम्हाला अत्यंत आवडलेला, तुमचा माहितीपट. खरं तर हा माझ्याच मनातल्या प्रार्थनावादाचा विजय होता. नव्हे का? कवितेच्यासाठी, कवीच्या काव्याचा, अस्तित्वाचा अमोल ठेवा जपायला मीं निघाले होते. एकच प्रार्थना मनातून मीही करीत होते. "ग्रेस! माझ्या प्रामाणिक प्रयत्नांना साथ द्या! माझं काम निर्विघ्न पार पडू द्या!" आणि प्रार्थना ऐकली गेली. यश हाती आलं. 'ग्रेस'नी 'ग्रेसफुल' शूटिंग दिलं. माझे शूटिंग करतानाची दिग्दर्शक म्हणून केलेली एकही विनंती तुम्ही अमान्य केली नाहीत. तोच आदर शेवटपर्यंत माझ्याविषयी ठेवलात. तुम्हाला धन्यवाद तरी किती द्यायचे? तेही राहूनच गेलं.

या जीवनातल्या दुःखाला सामोरं जाताना तुम्हाला एक शब्दांचाच आधार होता. तुमच्या व्यामिश्र व्यक्तिमत्त्वाला विसावण्यासाठी तोच एक किनारा होता. कदाचित तुम्ही असेही म्हणाला असतात

*शब्दच होते सांगाती*
*शब्दांची नाती गोती*
*मी सोडुनि सारे उठलो*
*देहाची होइल माती*
*त्या मातीतुनी झरतील*
*अन् पुन्हा गंधली गीते*
*हे तुटता तुटताचि नाही*
*शब्दांशी अक्षय नाते*

आयुष्यभर तुम्ही माणिक गोडघाटे आणि कवी ग्रेस यांना एकाच देहात वस्ती करून दिलीत. माणिक गोडघाटे पेक्षाही तुम्ही ग्रेसला, ग्रेसच्या कवितेला प्राधान्यानं जपलात. ग्रेसची कविता तळहातावरील फोडासारखी जपण्यासाठी माणिक गोडघाटेंनी बऱ्याच खस्ता खाल्ल्या. आरती प्रभूंनी म्हटलंच आहे ना

*तो कुणी माझ्यातला तो घननभी ठेचाळतो*
*तरिही मी का चालतो, ना बोलतो ना थांबतो?*

तुमच्यातल्या ग्रेसला तेजाळवून टाकण्यासाठी बरेच दुःखभोग रिचवणं भाग होतं माणिक गोडघाटेलाही! ते तुम्ही रिचवलेत, बऱ्याच जखमा सहन केल्यात. देहाचे दुःखभोग सावरणं सोपं असतं पण मनाचे दुःखभोग सावरणं अत्यंत अवघड! म्हणूनच तुम्ही कदाचित असंही म्हणाला असतात ना!

*मन दुखरे गूढ गंभीर*
*शब्दातुन उसवत जाते*
*अन उदास संध्यासमयी*
*निष्पर्ण होउनी फुलते*
*मी लिहित गेलो काही*
*बरळलोच काही थोडे*
*पण कवितेला मी दिधले*
*आत्म्याचे सतेज तोडे*

कविता तुमचा श्वास होती. निःश्वास होती. तिच्याशी प्रतारणा तुम्ही कधीच सहन केली नाहीत. आपल्यातल्या कवित्वाचा सन्मान तुम्ही नितांत जपलात! उच्च प्रतीचा कलावंताचा अहंकार तुमच्या सर्व वागण्यातून, आविर्भावातून दिसायचा. तो तुम्हाला शोभायचाही. ग्रेसवर दुर्बोधतेचा शिक्का मारणाऱ्या लोकांच्या हे लक्षात कसं यावं की, ज्या जगण्याशी ग्रेस कधीच बेइमान झाला नाही, त्या जगण्यात तरी कुठे सुबोधता आहे? फक्त तुम्ही त्या दुर्बोधतेशी प्रामाणिक राहून ती जशीच्या तशी व्यक्त करत गेलात. फुलांचा बाजार मांडत बेगडी मुखवटे



अनुक्रमणिका

लावून तुम्ही मिरवला असतात तर कदाचित सुबोध झाला असतात का? पण तसं करणं 'ग्रेस'ला तरी केवळ अशक्य होतं.

अखेर तुम्ही मृत्यूला मिठी घालण्याचा आणि आम्ही तुम्हाला अंतरण्याचा कठोर दिवस उगवलाच. बरीच प्रतीक्षा केल्यानंतर तुमचे कॉफिनमध्ये ठेवलेले पार्थिव हॉस्पिटलच्या व्हरांड्यात आणलं गेलं आणि त्या कठोर वास्तवाला सामोरं जाताना मनात उमटले 'चर्चबेलचे' असंख्य धनी, प्रतिध्वनी, खिळ्यांनी क्रूसावर ठोकलेलं एक सत्य. सहन करण्याच्या पलीकडचं आणि सहन करण्याची सक्तीचं दर्शवणारं. तुमचं पार्थिव असं कॉफिनमधून समोर येणं, सहन करण्याच्या सर्व सीमा ओलांडून जाणारं वाटलं. तुमच्यातल्या कवीला जर देवानं बोलायची एकच संधी दिली असती, तर तुमच्यातला आत्ममग्न कवी कदाचित म्हणाला असता...

*अन् एकच दगड असू द्या*
*त्या जागी संगमरवरी*
*अन् त्यावर कोरून ठेवा*
*रक्ताने लिहिली गाणी...*

तुम्ही गेलात!- पण आता मनात आठवणींचं प्रचंड मोहोळ उठत आहे. तुम्ही म्हणाला होतात मी म.सा.प.मध्ये येईन 'ते शेवटी राहून गेलं. राहून गेलं तेही तुमच्या स्वभावधर्माला साजेसंच झालं. पण ते तुमच्या मनात होतं आणि आपला बोल सच्चा करण्याइतके सच्चेपणा तुमच्यामध्ये होता, यावरही माझा विश्वास होता. पोटात कॅन्सरच्या वेदना होत असतानाही तुम्ही 'अनन्वय'च्या कुसुमाग्रजांच्या जन्मशताब्दीच्या कार्यक्रमाला आला होतात केवळ शब्द दिला होता म्हणून! म्हणून म्हणाले, ते राहूनच गेलं. परत एकदा तुमच्या विचारधारेतले प्रवाह घेऊन तुम्हाला बोलतं करायचं होतं तेही राहून गेलं. आणिक एक महत्त्वाचा शब्दही द्यायचा, घ्यायचा राहून गेला तो आता बोलते!

अलविदा! ग्रेस!. तुमच्या ग्रेसफुल आठवणीच आता राहातील सोबत! अलविदा!

◇◇◇

**माधवी वैद्य**
'जनार्दन', प्लॉट क्र. ५२,
स्वेदगंगा हाऊसिंग सोसायटी, वारजे, पुणे ५८
दूरध्वनी : (०२०) २५२३०१७४
भ्रमणध्वनी : ९८२२०३६५४४
madhavivaidya@gmail.com

## वार्षिक ग्रंथकार पुरस्कार (२६ मे २०१२)

| पुरस्काराचे नाव | पुरस्कार विजेते |
|---|---|
| राजा फडणीस पुरस्कृत रामाचार्य अवधानी पुरस्कार (तत्त्वज्ञानविषयक) | डॉ. कल्याणी नामजोशी |
| भा. रा. तांबे पुरस्कार (ज्येष्ठ कवीस) | प्रा. फ. मु. शिंदे |
| ना. घ. देशपांडे पुरस्कार (गेय कविता) | अनिल कांबळे |
| म. ना. गोगटे पुरस्कृत गो. रा. परांजपे पुरस्कार (विज्ञानविषयक लेखन) | अतुल कहाते |
| श्रीपाद जोशी पुरस्कार (संदर्भ ग्रंथ, अनुवाद, आंतरभारती कार्य) | डॉ. द. दि. पुंडे |
| कमलाकार सारंग पुरस्कार (नाट्यविषयक) | गिरीश जोशी |



अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वर्धापनदिनी (२७ मे २०१२ रोजी) 'मसाप सन्मान पुरस्कार' ज्येष्ठ लेखक श्रीनिवास कुलकर्णी यांना तसेच 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' 'ग्रंथाली' चे दिनकर गांगल यांना अ.भा.मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षा प्रा. उषा तांबे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला.

यावेळी डावीकडून परिषदेचे कोषाध्यक्ष सुनील महाजन, कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, श्रीनिवास कुलकर्णी, प्रा. उषा तांबे, परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर, दिनकर गांगल, परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिक वितरण कार्यक्रमात (२६ मे २०१२ रोजी) मोठ्या संख्येने उपस्थित असलेला श्रोतावर्ग.





'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे'च्यावतीने बालकुमारांसाठी तयार करण्यात आलेल्या 'ई—निरागस' या अंकाचे प्रकाशन सिंगापूरमध्ये नुकतेच करण्यात आले.

यावेळी प्रसन्न पाध्ये (अध्यक्ष, महाराष्ट्र मंडळ, सिंगापूर), राजश्री लेले (उपाध्यक्ष, महाराष्ट्र मंडळ, सिंगापूर), डॉ. माधवी वैद्य (कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे) आदी मान्यवर उपस्थित होते.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिक वितरण कार्यक्रमात (२६ मे २०१२ रोजी) तरुण कवी ऐश्वर्य पाटेकर यांना 'डॉ. अ. वा. कुलकर्णी पारितोषिक' ज्येष्ठ साहित्यिक डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले.

यावेळी डावीकडून पाटेकर, म.सा.परिषदेचे कोषाध्यक्ष सुनील महाजन, डॉ. कोत्तापल्ले, परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर, कार्याध्यक्षा डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी उपस्थित होते.













अनुक्रमणिका

# मी आणि माझे लेखन : कथेमागची कथा

– भारत सासणे

*[आपल्या निर्मितीप्रक्रियेविषयी बोलताना प्रतिभावंतांचे एकच सांगणे असते, ते म्हणजे– कोणतीही कलाकृती ही अनुभवांची पुनर्निर्मिती असते. मनोभूमीत केव्हातरी कुठेतरी कलेचे बीज रुजते. योग्य वेळी ते फलद्रूप होते. मात्र 'को कालो फलदायक:?' ह्या सनातन प्रश्नाचे उत्तर कलेच्या बाबतीत अनिश्चित आहे. कोणता काळ फळ देणारा असेल हे कोणताही कलाकार सांगू शकत नाही. तसे समीक्षकही सांगू शकणार नाही. माणसाचे अनाकलनीय मन समजून घेण्याचा कलाव्यापार– कोणत्याही एका ठराविक मार्गानेच जातो, असे म्हणणे योग्य होणार नाही. कलाकाराच्या अव्याहत शोधयात्रेत प्रत्येकाची अनुभूतीप्रक्रिया वेगळी असते. ती कलाकाराकडूनच समजून घेणे, हा एक औत्सुक्याचा भाग झाला. कलानिर्मितीला नियमनियमावलीत बसवता येत नाही. असे असले तरी, ही 'शोधयात्रा' कशी अनुभवली; ह्याच्या काही पाऊलखुणा कलाकार सांगू शकतो. यशस्वी कथालेखक भारत सासणे ह्यांनी 'कथेमागची कथा' आपल्या अनुभवातून सांगितली आहे. त्याचा एक समीक्षाग्रंथही होणार आहे. मराठी समीक्षा वाङ्मयात ही मोलाची भर पडेल; अशी अपेक्षा आहे.*

*–संपादक]*

मी आणि माझे लेखन या विषयावर बोलताना खरे तर स्वत:शीच जास्त संवाद करावा लागेल आणि कथेमागची कथा उलगडून सांगण्याचे अवघड असे काम करावे लागेल.

**: १ :**

कोणताही लेखक लिहितो तेव्हा त्याला काहीतरी अपार आणि अनिवार असे सांगायचे असते, नसता त्याने लिहिलेच नसते. जे काही सांगायचे आहे ते अपरिहार्य होऊन प्रकट होऊ लागते तेव्हा लेखन केल्याशिवाय साहित्यिकाला-लेखकाला दुसरा पर्याय उरत नाही. हे जे उतरून येणे आहे त्याला अनेकांनी प्रतिभेचे प्रकटीकरण असे म्हटले आहे. अचानक खूप जोराने वारा वाहतो व दारे-खिडक्या थरथरू लागतात. त्याला बा. भ. बोरकरांनी 'आला अद्‌भुत वारा' असे काही म्हटले आहे. हे प्रतिभेचे अवतरणंच आहे. प्रतिभावंतांनी आपल्या अंतर्गत असलेल्या व कोठून तरी येणाऱ्या अनिवार्य ऊर्जेच्या प्रकटीकरणांबाबत असेच काही नोंदवून ठेवले आहे. संतकवींच्या साक्षी देखील निर्मितीप्रक्रियेबाबत बोलतात. उदाहरणार्थ, मोत्याची माळ जशी गुंफली जावी तशी अक्षरे एकामागोमाग एक अनावरपणे उमटत आहेत, असे संत रामदास यांनी म्हटले आहे, तर कविता झऱ्यासारखी, त्यातल्या पाण्यासारखी सरसर वाहते आहे, असे तुलसीदास यांनी लिहून ठेवले आहे. जे सांगायचे आहे ते सांगणे विविध माध्यमातून प्रकट होऊ लागले की, त्या प्रकटीकरणाबद्दल प्रतिभावान मंडळी नोंदी करीत असतात. बुधकौशिक ऋषीनेदेखील स्वप्नातून कविता स्फुरली असे रामरक्षेच्या संदर्भात लिहून ठेवले आहे.

आत्मोद्‌गार अपरिहार्य होऊन प्रकटू लागतो तेव्हा चांगल्या किंवा श्रेष्ठ कलाकृतीचा जन्म होतो. बहुधा असा आत्मोद्‌गार सहकंपातून निर्माण होतो. भोवताली, अनेक पातळ्यांवरून, अनेक पद्धतीने, अनेक प्रकारे संघर्ष करीत जगत राहणाऱ्या जीवांकडे पाहून जी काही एक वैश्विक करुणा निर्माण होत असेल त्या करुणेतून काहीएक प्रेरणा घेऊन लेखक लिहायला लागतो व अनेकांच्या वेदना स्वीकारून आणि सहकंपित होऊन जीवनदर्शी लेखन करतो. चिंतनशील व प्रामाणिक अशा लेखकाचे हे असे भागधेय असते. मग मनोरंजन किंवा बुद्धीरंजन हा लेखनाचा हेतू उरत नाही, तर सर्वसामान्य माणसाचा शोध हा हेतू लेखनामागे



अनुक्रमणिका

शिल्लक राहतो. जगभरातील सर्वच चिंतनशील लेखकांनी अशीच साक्ष दिलेली आहे.

: २ :

मानवी जीवनाबाबतची एकूण आस्था, सर्वसामान्य माणसाला केंद्रबिंदू मानून त्याच्या सुख-दु:खाचा शोध घेण्याची इच्छा इत्यादी घटक लेखकाला लिहितं करतात याबाबत काहीएक चिंतन केल्यानंतर स्वत:च्या लेखनाकडे मला वळून पाहायचं आहे. सामान्यत: एखादा सामान्य लेखक ज्या दालनातून जास्त रमतो त्या दालनात मी स्वत: रेंगाळलेलो नाही. उलट, जीवनाचे जे घटक दुर्लक्षित राहिले; त्याकडे मी आकृष्ट झालेलो आहे. माझ्या अगदी सुरुवातीच्या कथांमध्ये स्वाभाविक 'रोमँटिसिझम' येण्याच्याऐवजी 'वृद्धावस्था व वृद्धांचे प्रश्न' इत्यादी वास्तव प्रकर्षाने आलेले आहे. जातीधर्माची विभिन्नता, माणसामाणसातील विलक्षण नाती इत्यादी अनेक चकीत करणाऱ्या पैलूंकडे मी सुरुवातीलाच ओढलो गेलो; आणि एक चिंतनशील अशी माझ्या लेखनाची प्रकृती आपोआप ठरू लागली. नंतर, काही समीक्षकांनी आणि अभ्यासकांनी तसे दाखवून दिले आहे. हे आपोआप घडले नसावे. याला, मान्य असल्यास, आपण ईश्वरीप्रसाद म्हणू शकतो. काव्यात्म भाषेत 'प्रतिभावंताचा शाप' असेही म्हणता येईल. तुम्हाला माणसाची वेदना कळते, त्याच्या छातीत दडलेले वेदनेचे शहर त्याच्या डोळ्यातून तुम्हाला दिसते, त्याचा संभ्रमित यातनाप्रवास तुम्हाला जाणवतो-कळतो हा तुम्हाला मिळालेला शाप असतो. त्यामुळे तुम्ही उथळ, वृथा असे काही लिहित नाही. जे इतरांना दिसते त्यापलीकडेसुद्धा तुम्हाला दिसत असते, हा तुमचा शाप!

मला जेव्हा, तुमची कथा आवडली परंतु समजली नाही, किंवा तुमची कथा समजली पण आवडली नाही, किंवा समजलीही नाही व आवडलीही नाही, किंवा आवडलीही व समजलीदेखील, अशाप्रकारच्या प्रतिक्रिया प्राप्त होतात; तेव्हा माझ्या लेखनामध्ये दोन प्रवाह आहेत असे माझ्या लक्षात येते. या दोन प्रवाहांची लेखक या नात्याने जाणीव असणे महत्त्वाचे आहे. तुमच्या कथा भावतात; तेव्हा त्या हृदयगम्य असतात. तुमच्या कथा समजतात; तेव्हा त्या बुद्धिगम्य असतात. हृदयगम्यतेचा आणि बुद्धिगम्यतेचा झगडा हे माझ्या लेखनातले वास्तव. याचा उलगडा हळूहळू पुढे होत गेलेला आहे. मानसशास्त्राने अंतर्मुखी आणि बर्हिमुखी प्रवृत्ती सांगितलेल्या आहेतच. बुद्धिमान समीक्षकांनीदेखील आंतरवर्तुळातील साहित्य व बर्हिवर्तुळातील साहित्य असे दोन भेद साहित्याच्या संदर्भात केलेले आहेत. आता, या दोन वर्तुळक्षेत्रामध्ये जीवनाशी संबंधित असे कोणकोणते घटक समाविष्ट होतात, याचा आपण शोध घ्यायला लागतो.

अंत:स्फूर्ती, प्रेरणा, सहानुभूती, दया, क्षमा, त्याग, सेवा, प्रेम नावाची अमूर्त वस्तू, मानवता, अंतिमत: ईश्वर, असे काही घटक आंतरवर्तुळातील साहित्यात समाविष्ट होताना दिसतात. या घटकांची यादी आणखी सूक्ष्म व विस्तारित होऊ शकते. देवीस्तुती करत असताना भूक तूच आहेस, तहान तूच आहेस, युद्धी तूच आहेस, क्षमा तूच आहेस इत्यादी सूत्रांची आपल्याला आठवण येऊ शकते इतके सांगितले म्हणजे पुरे. ही सगळी चिरंतन मूल्ये आहेत.

त्याउलट, बर्हिमुखी साहित्याच्या वर्तुळात युद्ध, रक्तपिपासा, सत्तासंघर्ष, उपासमार, मारामाऱ्या, राजकारण, विश्वासघात, दारिद्र्य, बेकारी, जगण्याबाबतच्या चिंता, लैंगिक क्रौर्य आणि विकृती व ईश्वराला नाकारणे इत्यादी घटक समाविष्ट होताना दिसतात.

चांगले साहित्य आणि श्रेष्ठ साहित्य असा भेद जाणकार करीतच असतात. आंतरवर्तुळातील साहित्य श्रेष्ठ साहित्य असू शकते. साहित्यांतर्गत सामाजिकता असणे व दिसणे ही श्रेष्ठ साहित्याची पूर्वअट नसते. करुणेतून निर्माण झालेली सामाजिकता मात्र आंतरवर्तुळातील साहित्यामध्ये समाविष्ट असण्याचा संभव असतो. बाह्यवर्तुळातील साहित्यात सामाजिकता आवश्यक व अनिवार्य मानली जाते, तथापि असे बाह्यवर्तुळातले साहित्य अनिवार्यपणे श्रेष्ठ असते असेही नसते.



अनुक्रमणिका

आंतरवर्तुळातील घटक आणि बाह्यवर्तुळातील घटक या दोन्हींचा लेखकाला साकल्याने विचार करावा लागतो. त्याची लेखणी, त्याचा अंत:स्वभाव कोणत्या वर्तुळाशी जास्त जोडला जातो आहे हे पाहून त्याला आत्मप्रकटीकरण करावे लागते. हे करीत असताना वास्तव नावाच्या एका अवघड अशा गुंत्याशी सामना करावा लागतो. एखाद्याचे लेखन वास्तववादी आहे की नाही, असे सहजच ठरवले जात असले, तरी लेखकाला स्वत:ला मात्र वास्तव नावाच्या अमूर्त कोड्याची सोडवणूक करण्यात शक्तीचा व्यय करावा लागतो.

आता, एकच एक वास्तव कधीच नसते. माझे वास्तव दुसऱ्याचे स्वप्न असू शकते. त्यामुळे वास्तव व्यक्तिसापेक्ष असते असे म्हणतात. वास्तव बदलत राहते आणि मुळातून ते बदलतसुद्धा नाही. उदाहरणार्थ, चिरंतन मूल्ये किंवा ईश्वरी सत्ता बदलत नाही. आंतरवर्तुळाशी संबंधित घटकांमध्ये समाविष्ट असलेले वास्तव बदलत नाही. बाह्यघटक बदलत राहतात. समाज बदलतो, मान्यता बदलतात, गरीबी आणि श्रीमंती येते आणि जाते, बेकारी वाढते आणि कमी होते. या बदलत्या वास्तवाची प्रामुख्याने बाह्यवर्तुळातल्या साहित्याने जास्त दखल घेतली आहे. आंतरवर्तुलातील साहित्य मात्र जास्त जीवनवादी असते. मनुष्यजीवनाबद्दल सखोल आस्था दाखवण्याकडे या आंतरवर्तुळातील साहित्याचा कल दिसून येतो.

म्हणजे, आंतरवर्तुळातील साहित्य जास्त जीवनवादी व संवेदनशील असून असे साहित्य चिरंतन मूल्याचा विचार करते, तसेच अपरिवर्तनीय वास्तवाशी जवळीक साधते; त्यामुळे ते श्रेष्ठ साहित्याची गुणवत्ता प्राप्त करण्याच्या दृष्टीने वाटचाल करण्यास पात्र ठरते. लेखकाला वास्तवाची दखल घ्यावी लागते. यामुळे माणसाच्या दु:खाचा मागोवा घेता येतो व हेच लेखकाचे कार्य असते.

माझे लेखन आंतरवर्तुळातील घटकांशी, अर्थात जीवनाच्या चिरंतन मूल्यांशी जवळीक साधते आहे, असे लक्षात आल्यानंतर व त्यामुळे आपले लेखन कदाचित श्रेष्ठ दर्जाचेसुद्धा होऊ लागले आहे, असे लक्षात आल्यानंतर त्यातल्या जबाबदारीची जाणीव होऊन मी त्वरेने सजग होऊन गेलो. स्वत:ला उन्मत्त होऊ न देण्याची ही दुर्मीळ अशी संधी होती.

: ३ :

लेखकाची लेखनामागील अपरिहार्यता, त्याला लिहितं करण्यामागील काहीएक प्रेरणा, जीवनाबाबतची वैश्विक करुणा व चिरंतन मूल्यांचा आणि सर्वसामान्य माणसांचा शोध घेण्याची आंतरिक इच्छा या सर्वांमधून लेखन स्फुरत जाते. अशी काही सैद्धान्तिक मांडणी केल्यानंतर व स्वत:चे साहित्य आंतरवर्तुळातील घटकांशी नातं सांगतं आहे, असं लक्षात आल्याचं सांगितल्यानंतर कथा आणि कथेमागची कथा या दुसऱ्या टप्प्याचा आपण थोडा शोध घ्यायचा आहे.

विचारापासूनच विचार पुढे जातो आणि एखाद्या कथेतूनच पुढची, उत्तराभिमुखी कथा निर्माण होते. म्हणून सुरुवातीचीसुद्धा सुरुवात असते. म्हणजे एखादी कथा लिहिली, त्यामागे कथा असतेच. त्याबाबत थोडी आपण चर्चा करू.

वीस किंवा पंचवीस वर्षांपूर्वी मी एका पंजाबी कथेचा अनुवाद वाचला होता. ती कथा आठवेल तशी प्रथम येथे सांगतो. कथानिवेदक-नायक एक समंजस असा शीख पुरुष आहे. सर्वच परंपरावादी पुरुषांना लागते तशी त्यालादेखील आपल्या बायकोची मदत बारीकबारीक गोष्टीतसुद्धा लागत असते. उदाहरणार्थ रुमाल शोधून दे, किंवा पायमोजे आणि टाय शोधून दे, किंवा तेलाची बाटली आणून दे इत्यादी. कथानायक शीख असल्यामुळे धर्मपरंपरेप्रमाणे त्याचे केस लांब आहेत. त्यामुळे त्याला पगडी वगैरे बांधण्यासाठी वेळ लागतो. तेलाची बाटली, कंगवा इत्यादी आणून देण्यासाठी बायको लागते. म्हणून परंपरेप्रमाणे प्रत्येक दिवशीच्या सकाळी तो बायकोला हाका मारतो; आणि तिला बारीकसारीक वस्तू आणण्याचे फर्मावतो. हे रोजच व कित्येक वर्षे चालत असले तरी एक दिवस त्याची बायको चिडून त्याला असं





अनुक्रमणिका

म्हणते की, 'मी काही तुमची नोकर नाही, स्वत:ची कामे तुम्ही स्वत:च करीत जा आता.' समंजस व विचारी कथानायकाला हे प्रत्युतर थोडेसे झोंबते व दुसऱ्या दिवसापासून तो स्वत:ची छोटी छोटी कामे स्वत:च करू लागतो. पायमोजे आणि रुमाल स्वत:च शोधणे, स्वत:चे बूट साफ करून ठेवणे, तेलाची बाटली स्वत:च शोधून आणून आपल्या केसांना स्वत:च तेल लावणे इत्यादी कामे प्रयत्नपूर्वक कथानायक करतो आहे. त्याला हे काम अवघड तर वाटते आहेच. कारण कोठे काय ठेवले आहे हे त्याला माहीतच नाही. आपोआप सगळ्या वस्तू कालपर्यंत हातात येत होत्या. आता त्या शोधाव्या लागतात. कथानायक आपली कामं स्वत:च करतो आहे. बायकोला सुरुवातील थोडी गंमत वाटते. एक-दोन दिवस ती मजेने सगळं काही पाहते. पण तिसऱ्या दिवशी मात्र अचानक रडू लागते. मी जिवंत असेपर्यंत हे सगळं मला करू द्या. मी मेल्यानंतर तुम्हाला काय करायचे ते करा, असं म्हणून ती तेलाची बाटली हिसकावून घेते व पूर्ववत त्याला छोट्या छोट्या कामात मदत करीत राहते, त्रागाही व्यक्त करीत राहते. कथानायक आपल्या निवेदनाच्या अखेरीस वाचकांना असं म्हणतो की, स्त्रियांचं मन कळत नाही हेच खरं!

आता, स्त्रीचं मन कळणे किंवा न कळणे या मुद्द्यावर आल्यानंतर या कथेपासून वेगळी, चिंतनशील प्रकृती अशी कथा जन्माला यायला हरकत नव्हती. मात्र दुर्दैवाने या कथेकडे विनोदी कथा म्हणून पाहिलं गेलं; आणि 'स्त्रीचं मन समजत नाही', या निष्कर्षाकडे एक विनोदी किस्सा म्हणून पाहिलं गेलं. वीस ते पंचवीस वर्षांपूर्वी स्त्रीवादाबाबत मराठीसह अन्य भाषांमध्येही थोडी चर्चा सुरू झाली होती व त्यामुळे ही कथा महत्त्वाची ठरू शकली असती. अशा प्रकारची मनोविश्लेषणात्मक कथा काहीएक परिमाणही देऊ शकली असती. पण तसे झालेले दिसत नाही. पंजाबी कथांच्या एका प्रातिनिधीक संकलनामध्ये ही कथा वाचल्यानंतर आणि या कथेवरील समीक्षणपर टिपण वाचल्यानंतर आपल्या सर्वांची गफलत होते आहे, असे लक्षात आले. आंतरवर्तुळ्यातील घटकांकडे बाह्यवर्तुळातून बघताना अशा गफलती होत असतात. विनोदी कथा म्हणून या कथेतल्या विचारांची बोळवण केल्यामुळे पुढील टप्प्यावरील सूक्ष्म व प्रगत अशी कथा निर्माण झाली नाही. मात्र ही जुनी कथा वाचल्यानंतर आत्ताच्या स्त्री-पुरुष समानतेच्या युगात वावरणाऱ्या माझ्यासारख्या चिंतनशील लेखकाला ही कथा आणखी पुढे न्यावीशी वाटायला लागली. वैचारिक पक्वतेचा शोध घेणारी एक छोटी कथा लिहावी असे मला वाटले. मी लिहिलेल्या या कथेच्या मागची प्रेरणा वरच्या पंजाबी कथेत असली तरी त्याचा विस्तार हा माझ्या पद्धतीने व सध्याच्या वातावरणाशी सुसंगत असा झालेला आहे. ही लहानशीच कथा आहे. त्याचा गोषवारा असा. कथानिवेदिका एक गृहिणी असून पंधरा-एक दिवसांच्या अंतराने आपल्या घरी, सासरी परत आली आहे. येताना तिची मैत्रीण तिच्यासोबत आहे. नवरा कुठेतरी बाहेर गेलेला आहे. डुप्लिकेट चावीन घर उघडणे आणि घरात प्रवेश करणे इत्यादी सोपस्कार झाल्यानंतर दोन्ही स्त्रिया जाणकार नजरेने घराच्या पसाऱ्याकडे पाहू लागतात. काही काही ठिकाणी कचरा गोळा करून ठेवलेला आढळतो, जणू तो आता तिने-कथानायिकेने उचलायचा आहे. स्त्रीवादी मैत्रिणीला संताप येतो. ती रागाने म्हणते, यांना आमच्या अनुपस्थितीत घर स्वच्छ ठेवता येत नाही. पण संतापजनक बाब अशी आहे की, हा कचरा आता जणू तू उचलायचा आहेस, अशा आविर्भावात ठेवलेला आहे. कथानिवेदिका त्यावर विचारी होऊन, घरभर फिरून व पाहणी करून काहीएक निष्कर्षाला येते. नंतर हसून ती असे म्हणते की, सर्वत्र स्वच्छता असून काही काही ठिकाणीच कचरा गोळा करून ठेवलेला आहे हे अतिशय सूचक आहे. जर हाही कचरा उचलला गेला असता व घरात सर्वत्र टापटीप दिसली असती तर आपल्या अनुपस्थितीत आपल्यावाचून कुणाचे काही अडत नाही, असा संदेश प्रसृत झाला असता. मात्र हा कचरा हेतुत: असाच ठेवून आपल्या

अहंकाराला सुखावण्याची तजवीज येथे करून ठेवण्यात आली आहे. आपण आता हा कचरा उचलू, त्रागा व्यक्त करू, पण आतमध्ये अहंकार सुखावत राहील. आपण कोठेही गेलो असलो तरी आपल्या अनुपस्थितीत यांचे अडते, आपली आवश्यकता आहेच हे पुन्हा सिद्ध होते, हे जाणून मनोमनी आपण सुखावून जाऊ; आणि असेच व्हावे यासाठी ही व्यवस्था आहे. तसे नसते तर काही काही ठिकाणीच नाही; तर सर्वत्रच कचरा पसरून राहिलेला असता. आपल्या अनुपस्थितीत आपल्यावाचून अडते हा संदेश पोहोचवण्यामागील हुशारी खरं तर लक्षात यायला नको, पण तशी ती लक्षात आली आहे हे देखील आता आपण लक्षात आणून द्यायला नको. कारण एका विचारी पुरुषाचे हे आयोजन आहे. हे आयोजन लक्षात आले नाही असेच विचारी स्त्रीने दाखवायचे असते. दुसऱ्या मैत्रिणीला हा सूक्ष्म बुद्धिवाद अर्थातच लक्षात येत नाही. कथाकार म्हणून माझे काम इथे संपलेले असते. एकमेकाला समजून घेऊन, एकमेकांना साथ करीत जगणाऱ्या स्त्री-पुरुषांची कथा, कथेनंतरसुद्धा सुरू राहते. पंचवीस वर्षांपूर्वी लिहिलेली पंजाबी कथा व आताच्या सूक्ष्म मनोविश्लेषणाच्या पातळीवरील मी लिहिलेली ही आधुनिक कथा यामधला हा फरक मी येथे मुद्दामच अधोरेखित करतो आहे. कथा स्फुरते ती एखाद्या छोट्याशा विचारातून. स्त्रीवाद आंतरवर्तुळातील घटकांशी जवळीक साधणारा वाद असल्यामुळे मला पटकन समजतो असे म्हणतात हे खरे आहे, पण त्याही वादाच्या पलीकडे जाणारा सामंजस्याचा विचार या कथेत मी मांडलेला आहे. अर्थात असे स्त्री-पुरुष घराघरातून असणार नाहीत, हेही खरे आहे.

'चिरतरुण दुःखांचे बुरूज' ही माझी एक आवडती दीर्घकथा आहे. मी एकदा एक पाण्याखाली जाणारे गाव पाहायला गेलो होतो. त्या छोट्याशा गावात फक्त एकच दोन मजली इमारत होती. एक वृद्ध डॉक्टर तिथे राहत. घरासमोर पिंपळाचे झाड होते. पट्ट्यापट्ट्याच्या कापडाचा पायजमा घातलेले ते डॉक्टर जुन्या ध्वनीमुद्रिका ऐकत बसत. त्यांच्याकडे बालगंधर्वांच्या आवाजातील गाणी होती. वीज असेल तेव्हा त्यांचा ग्रामोफोन वरच्या मजल्यावरून वाजायला लागे; आणि सगळा भूतकाळ पिंपळाच्या सळसळत्या सावलीच्या साक्षीने त्या घराभोवती गोळा होई, सकाळला जाई. मला नेहमी तिथे कालप्रवाह गोठल्याचा दिसू लागे. कालप्रवाह एखाद्या नागिणीसारखा असून नदीच्या रूपाने त्या सगळ्या गावाला गिळंकृत करीत आहे, ही वस्तुस्थिती त्या गावात जाणवू लागे. त्या डॉक्टरांशी मला कामानिमित्त बोलावं लागे. ते म्हणत की, गावावर पाणी जरी आलं तरी गाव सोडून, घर सोडून त्यांना जायचं नाही, पाण्यातच बुडून जायचं आहे. माझ्या नोकरीच्या निमित्ताने त्या गावी मी अनेकदा गेलो. तिथला पाण्याखाली जाणारा बुरूज पाहिला, त्यावरची पक्ष्यांची वसाहत पाहिली. ही वसाहतसुद्धा पाण्याखाली जाणार होती. म्हणजे पुनर्वसन फक्त गावाचे नव्हते, सर्व जीवांचे होते. काळ ही संकल्पना सापेक्ष आहे. गावावर पाणी लवकर येऊ नये असं वाटत असल्यामुळे त्या गावातील काळ स्तब्ध होऊन गेल्यासारखा वाटे. जणू, तिथली घड्याळं हळूहळू टिकटिकत आहेत. 'चिरतरुण दुःखांचे बुरूज' ही दीर्घकथा अशाच एका गावाची आहे. एक वृद्ध डॉक्टर, त्यांची तरुण मुलगी, घरातच आणून ठेवलेला एक पेशंट, डॉक्टरच्या घराभोवती फिरणारी एक वेडी वृद्धा, गावकरी, सरपंच, सायकलवर फिरणारा तरुण डॉक्टर या सगळ्यांमधून ही कथा वाहते. ही कथा या पात्रांची नसते, केवळ पाण्याखाली जाणाऱ्या गावाची नसते तर कालप्रवाहरूपी नदीची असते. या कथेवर चित्रपट बनवण्याचा प्रयत्न झाला. मुंबईचे तरुण व प्रतिभावान दिग्दर्शक श्री. शशांक शंकर यांनी इंग्रजीमध्ये या कथेवर पटकथा लिहिली. हे काम ते दोन-अडीच वर्षे करीत राहिले. त्यांनी या कथेमागची कथा स्पष्ट करण्याचा मला आग्रह केला. प्रत्यक्षात कथेमागची कथा स्पष्ट करण्याचं कथाकाराला कोणतेही आकर्षण असत नाही. जे सांगायचं आहे ते कथेमधून सांगितल्यानंतर, जे सूचक आहे किंवा



अनुक्रमणिका

लपलेलं आहे, ते स्पष्ट करण्याची कथाकाराला कोणतीही उत्सुकता राहत नाही. तथापि दिग्दर्शकाला कथेमागची कथा हवी असते. अमूक एक पात्र असे का वागले, त्या पात्राची कूळकथा काय आहे इत्यादी प्रश्न दिग्दर्शकाला पडतात. श्री. शशांक शंकर यांनी मला एक प्रश्नावली पाठवली होती. या प्रश्नावलीमध्ये उत्तरे देत असतानाच एक रजिस्टर भरून जाईल इतके लिखाण झाले. या कथेमागची कथा हे एक येऊ घातलेल्या नव्या पुस्तकाचेच रूप आहे. या पुस्तकात मूळ दीर्घकथा, इंग्रजी पटकथेचा मराठी अनुवाद आणि दिग्दर्शक व मूळ लेखक अर्थात मी स्वत: यामध्ये झालेला पत्रव्यवहार व कथेमागची कथा शोधण्यासाठी प्रश्नावलीच्या स्वरूपात मी केलेले लिखाण, इत्यादी मजकुराचा त्यात समावेश असणार आहे. स्वत:च निर्माण केलेल्या पर्यावरणाचा अन्वयार्थ शोधणे किती क्लेषकारक असते; याचा त्या निमित्ताने मी अनुभव घेतला. प्रत्येक पात्राची जन्मकथा सांगणे, त्या पात्राच्या वर्तनाचा अर्थ सांगणे इत्यादी काम अवघड आणि त्रासदायक आहे; हे माझ्या लक्षात आले. केवळ गावावरच नाही, घरावरच नाही तर माणसांच्या सगळ्या जन्मावर, त्यांच्या जगण्यावर, भूतकाळावर पाणी पसरून राहणार आहे, ही भावना मूळ कथेत भयभीत करतेच परंतु या कथेच्या आतमध्ये प्रवेश करून मनाने पात्रांच्या सोबत राहायला लागल्यानंतर अधिक भयभीत करते; याचा अनुभव मला आला. अस्तित्व संपवणारा पाण्याचा प्रवाह संबंध गावावर पसरून राहणार असतो तेव्हा ती वेळ लवकर येऊ नये म्हणून गावातील घड्याळे मंदावतात असा संदर्भ कथेत आलेला आहे. कालप्रवाह गोठणे ही संकल्पना भयभीत करून टाकते. पटकथा लिहून झाली तरी प्रत्यक्ष चित्रपटनिर्मितीस अद्याप सुरुवात झालेली नाही. लेखकाच्या हातामध्ये ते नियोजन नसते.

नश्वर शरीराचे भोग सगळ्यांनाच असतात. वाढत्या वयाबरोबर असे भोग सर्वांनाच भोगावे लागतात. रक्तदाब, मधुमेह इत्यादींबरोबर अनेक प्रकारच्या विविध व्याधी माणसाला घेरून असतात. सर्जनशील लेखक या नात्याने माणसाचे स्वत:च्या शरीराशी असलेले नाते शोधणे हे आव्हान मला वाटत आले. कधी स्वत:साठी तर कधी इतरांच्याबरोबर वैद्यकीय तपासण्यांसाठी विविध ठिकाणी मी जेव्हा जात गेलो; तेव्हा माणूस थोडा थोडा कळत गेला. व्याधी दुसऱ्याला आपल्याशी जोडते. येथे मग जात-धर्म इत्यादींचा प्रतिबंध नसतो. माणसे येथे एका पातळीवर येऊन एकमेकांशी जोडले जातात. अशाच काही निरीक्षणातून 'त्वचा' ही कथा मी लिहिली. कथानायिकेला अचानक त्वचारोग झालेला आहे. तो सुरुवातीला किरकोळ वाटत असला तरी नंतर उग्र रूप घेऊ लागतो; तेव्हा कथानायिका इतरांपासून तुटून स्वत:च्याच आत्मकेंद्राकडे ओढली जाते. आपण जर कुरूप झालो तर इतरांच्या दृष्टीने आपण कसे असू, असे काही प्रश्न तिला पडतात. वैद्यकीय तपासण्या, उपचार व त्यानिमित्ताने केलेले प्रवास यातून तिचा खऱ्या अर्थाने आत्मशोध सुरू होतो. आपण बाह्यात्कारी जसे दिसतो तसेच आपण आहोत काय व आपले रूप नष्ट झाल्यास आपले अस्तित्व काय राहील, असे काही हादरवून टाकणारे विचार तिच्या मनात सुरू होतात. यातूनच तिचे व तिच्या नवऱ्याचे संबंध, इतरांशी असलेले संबंध व स्वत:शी असलेले संबंध याबाबत कथा तत्त्वचिंतन करते. या कथेवर विचार सुरू असतानाच एका घटनेबाबत वाचले व ऐकले. एका बाईने आपला चेहरा प्लास्टिक सर्जरी करून बदलवून टाकला आहे. आता ती पूर्वीसारखी दिसत नाही. तिच्या नवऱ्याची मुलाखत टेलिव्हिजनवर दाखवण्यात आली होती. चेहरा बदलला तरी ती तीच आहे, असं त्याचं म्हणणं. चेहरा व व्यक्तिमत्त्व, त्वचा व आंतररूप याबद्दल माझी 'त्वचा' ही कथा काही विचार मांडते. अनेकांना ही कथा आवडली. त्यावर चर्चाही झाली पाठोपाठ 'येशूची कथा' नावाची कथा मी लिहिली. 'फ्रोजनशोल्डर'ची व्याधी जडलेले काही मित्र एका दवाखान्यात येऊन बसतात व स्वत:ची कथा व व्यथा सांगतात, असे काहीसे स्वरूप या कथेचे आहे. माणसे जेव्हा फिजिओथेरपिस्टच्या

दवाखान्यात एकत्र येतात व एकमेकांशी बोलतात तेव्हा त्यांचा भ्रातृभाव पाहण्यासारखा असतो. त्यानिमित्ताने माणसे एकमेकांशी बोलतात; आणि स्वत:ला आपल्यासमोर उलगडून ठेवतात. त्यांना असोशीने जगायचे असते. आतापर्यंत ज्या गोष्टींना ते महत्त्व देत आले त्या गोष्टी व्यर्थ असल्याचे त्यांच्या लक्षात आलेले असते. नात्यांचा फोलपणा त्यांनी अनुभवलेला असतो. नश्वर शरीराची व्याधी आणि कदाचित त्यापलीकडून डोकावणारा मृत्यू त्यांना समजलेला असतो. अशाच अनुभवांना पुढे नेणाऱ्या व समूहाचे चित्रण करणाऱ्या काही कथा मला वाटतं, मला लिहाव्या लागतील.

तालुका पातळीवर आणि तालुकासदृश्य जिल्हा पातळीवर राहून नोकरी करणाऱ्या विविध विभागांच्या द्वितीय आणि तृतीय श्रेणीतील कर्मचाऱ्यांचे निवासाचे प्रश्न मी अनेक वर्षे पाहत आलेलो आहे. त्यांना पुरवण्यात आलेली निकृष्ट निवासस्थाने व भयंकर सुविधा, कल्पना करता येणार नाही इतक्या वाईट पद्धतीच्या असतात. येथे राहणाऱ्या समूहांची मानसिकता मला दिसत आलेली आहे. भयंकर परिस्थितीत, अंधारात आणि अनारोग्याच्या वातावरणात राहणाऱ्या या कर्मचाऱ्यांकडून कार्यक्षमतेची मात्र अपेक्षा केली जाते. त्यांच्या एकूण मानसिकतेचं आणि जगण्यामध्ये निर्माण झालेल्या एकूण अनास्थेचं चित्रण करणारी 'ऐसा दुस्तर संसार' ही कथा मी लिहिली व त्यावर बरीच चर्चा झाली. याच शीर्षकाचा माझा नवा कथासंग्रह नुकताच प्रकाशित झालेला आहे. व्यक्तिकेंद्रित कथेपेक्षा समूहजीवनाचा वेध घेणारी कथा लिहिणे हे जास्त मोठे आव्हान असू शकते. समूहमनाची वेदना शोधणे क्लेशकारक आहेच.

कथेमागची कथा बघण्याचा लेखकाकडे दृष्टीकोन असेल, तर समर्थ कथा लिहिता येते. कथेमागची कथा सतत शोधावी लागते व कथेमागची कथा आपल्याभोवती सतत घडत असते. ती पाहण्याची नजर मात्र असावी लागते. लेखकाचे हेच मोठे आव्हान असते व ते तो कसे पेलतो यावर त्याचे यश अवलंबून असते.

माझे लेखन म्हणजे न संपणारी शोधयात्रा असून सर्वसामान्य माणसाच्या सुख-दु:खांचा शोध गांभीर्यपूर्वक घेणे मला आवडते. माणसाचे माणूसपण कशात आहे हे शोधत असताना त्याच्या जीवनसंघर्षातून, त्याच्या जगण्यातून, छोट्या-मोठ्या लढायातून, कथेमागची कथा दिसत असते. त्यातूनच कलाकृती निर्माण करावी लागते, त्यातूनच कलाकृती निर्माणही होत असते.

◇◇◇

**भारत सासणे**
२०४ लक्ष्मी एनक्लेव्ह, गणेशखिंड रस्ता,
मॉडेल कॉलनीजवळ, शिवाजीनगर, पुणे ४११०१६
निवास : ०२०-२५६६०९२२
भ्रमणभाष : ९४२२०७३८३३



## 'मुद्रांजली पुरस्कार'

दि. २० मार्च २०१२ रोजी सौ. सुशीला मोडक स्मृती व गुरुकुल प्रतिष्ठान आणि श्री. घन:श्याम दत्तात्रेय धोंड स्मृती यांच्यावतीने 'मुद्रांजली हा पुरस्कार'

स्मिता मुद्रणालयाचे संचालक श्री. हेमंत जोशी यांना मुद्रणमहर्षि श्री. अण्णासाहेब लाटकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. अत्याधुनिक तंत्रज्ञान जवळिक करून कामगारांसह चांगले मुद्रण प्रयोग यशस्वीपणे करण्याबद्दल सन्मानपूर्वक देण्यात आला.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेशी गेली २५ वर्षे निगडित असलेले श्री. हेमंत जोशी यांचे म. सा. परिषदेतर्फे हार्दिक अभिनंदन!



अनुक्रमणिका

# मोनिका गजेंद्रगडकर यांचे कथाविश्व

– डॉ. रवींद्र शोभणे

*[कथेचे वेगळेपण कशात असते? आशयात की अभिव्यक्तीत? 'माणूस' हा कथेचा विषय आहे. हर्ष-खेद-असूया इ. भावभावना न बदलणाऱ्या आहेत. कथानकातील संघर्ष, त्याच्या दोन किंवा बहुविध बाजू– बदलत्या सामाजिक-सांस्कृतिक आणि राजकीय पार्श्वभूमीमुळे नव्याने समोर येतात. निष्ठांचे स्वरूपही बदलते. विवाहबाह्य सहजीवन (लीव्ह-इन्-रिलेशनशिप), ठराविक कालबद्ध कराराचे वैवाहिक जीवन (कॉन्ट्रॅक्ट मॅरेजेस्), घटस्फोट, आंतरजातीय आणि आंतरधर्मीय विवाह इ. अनेक सांस्कृतिक वादळांनी कौटुंबिक सरळसाधी कथा वेगळे प्रश्न घेऊन येत आहे. विज्ञानकथा, कोलाजकथा, संज्ञाप्रवाही कथा इ. रचनाबंधानेही ती वेगळी होत असावी. प्रस्तुत लेखात मोनिका गजेंद्रगडकर यांच्या कथांची ओळख करून दिली आहे. त्यांच्या आशयबंधाची! –संपादक]*

आजच्या लिहित्या कथाकारांमधील एक आश्वासक, महत्त्वाचं नाव म्हणून मोनिका गजेंद्रगडकर या नावाचा आवर्जून उल्लेख करावा लागतो. सुमारे एक तपापासून त्यांचे सातत्यपूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण असे कथालेखन सुरू आहे. त्यांचे 'भूप' (२००४), 'आर्त' (२००८) आणि 'शिल्प' (२०११) हे तीन कथासंग्रह आतापर्यंत प्रकाशित झाले आहेत. या तीन कथासंग्रहांत एकूण अठरा कथा-दीर्घकथा-एकत्रित करण्यात आल्या आहेत. प्रत्येक कथासंग्रहात सहा अशा प्रकारे त्यांची विभागणी केली आहे.

मोनिका गजेंद्रगडकरांचा पहिला कथासंग्रह 'भूप.' १९९७ ते २००३ या सहा-सात वर्षांतलं हे लेखन आहे. त्या दृष्टीनं या कथांचं ताजेपण– संदर्भाच्या दृष्टीनं विचारात घ्यावं लागेल. अर्थात सामाजिक-सांस्कृतिकदृष्ट्या. आकृतिबंधाच्या दृष्टीनं यातल्या सगळ्याच कथा दीर्घकथा नाहीत. तर त्या दीर्घतेकडे झुकणाऱ्या आहेत. म्हणून या कथांच्या आकृतिबंधांच्या, रचनांच्या दृष्टीने विचार करावयाचा झाल्यास तो त्या त्या कथेच्या मुळाशी जोडल्या गेलेल्या अनुभवाच्या व्याप्तीवरून, त्या अनुभवाच्या प्रसरणशीलतेवरून करावा लागेल. अर्थात हे 'भूप'मधीलच कथांच्या नव्हे, तर 'आर्त' आणि 'शिल्प' यातीलही कथांच्या संदर्भात म्हणावे लागेल. या लेखिकेचे अनुभवविश्व ज्या तीन मुख्य क्षेत्रांना आणि त्यातही पुढील दोन क्षेत्रांना वारंवार भिडते ते वाङ्मय, संगीत आणि शिल्पकला याची प्रचीती 'भूप'मध्ये येते. 'देणं' (वाङ्मय), 'आधार' (चित्रकला) आणि 'भूप' (संगीत) या त्या कथा म्हणून उल्लेख करता येईल. संगीत ही कला आणि या कलेशी संबंधित व्यक्ती– त्यांचे भावसंबंध, नात्याची गुंतणूक आणि व्यामिश्रता हा या लेखिकेचा जिव्हाळ्याचा विषय म्हणता येईल. म्हणूनच 'भूप', 'जन्म' या कथा अधिक ठळकपणे समोर येतात. 'भूप'मधील वातावरण हे शास्त्रीय संगीताचे. संगीतावर अव्यभिचारी निष्ठा ठेवणारे अवधूतपंत आणि त्यांचं गाणं स्वीकारून, पचवून नव्या वाटा, आधुनिक जीवन स्वीकारणारा विवेक यांच्यातील आंतरद्वंद्व येतं. हा संघर्ष केवळ संगीतापुरताच उरत नाही, तर तो जीवनविषयक दृष्टिकोनाचाही आहे. आपल्या मुलानं आपल्यानंतर हा गायकीचा वसा पुढे चालवावा म्हणून अवधूतपंत विवेककडून अपेक्षा ठेवतात; पण विवेक मात्र गाणं पचवूनही जेनेटिक इंजिनियरिंगमध्ये आपलं करिअर करण्यासाठी अमेरिकेला जाण्याची स्वप्न पाहणारा व त्या स्वप्नांना मूर्तरूपात आणणारा. अवधूतपंत आपल्या स्वप्नपूर्तीसाठी चिंतनला उभे करतात. आपल्या आयुष्यातील विवेकची उणीव ते चिंतनमध्ये शोधू लागतात. पण चिंतन



अनुक्रमणिका

आपला कधी नव्हताच ही जाणीव एका क्षणी अवधूतपंतांना होते. शेवटी अवधूतपंतांचा पैतृक वारसा विवेकच पुढे चालवतो. मानवी नात्यातील गहिरेपणात या तीन व्यक्तींच्या– प्रवृत्तींच्या तीन वाटा शोधत लेखिका 'भूप' पूर्ण करते. परंपरेला चिकटून राहणारं पारंपरिक मन आणि नव्या वाटा धुंडाळणारं आधुनिक मन यातील संघर्ष या कथेत भरभरून आला आहे.

अशाच प्रकृतीची, संगीताची पार्श्वभूमी लाभलेली या लेखिकेची आणखी एक महत्त्वाची कथा म्हणजे 'जन्म'. 'भूप'च्या कथाशयाचा आवाका दीर्घकथेचा आहे, तसाच 'जन्म'चाही.

प्रस्तुत दोन कथांची पार्श्वभूमी वा मध्यवर्ती सूत्र संगीत हेच आहे. त्यामुळे या कथा पूर्णत: त्या प्रकृतीच्या ठरतात. त्या प्रकृतीचा अनुभव मांडताना लेखिकेची संगीताविषयीची जाण, समज याची प्रचीती सहजपणे येतेच. पण काही कथांमध्ये– त्यांचे मध्यवर्ती सूत्र वा पार्श्वभूमी संगीत नसली तरी– संगीताचे वा तत्सम संदर्भ वा घटना येत राहातात. उदाहरणार्थ– 'भूप'मधील 'देणं' ही कथा किंवा 'शिल्प'मधील 'अमलताश' ही कथा. 'देणं' या कथेचा विषय वाङ्मयव्यवहार आणि त्या व्यवहाराशी जोडलेल्या व्यक्ती असा– अर्थातच वरवरचा सांगता येईल. खरं तर ही कथा एकाच वेळी वाङ्मयव्यवहार, पुरातत्वविषयक, संगीतविषयक अशा मानवी जीवनव्यवहारांच्या वरच्या स्तरांवरून वावरत असली तरी त्यातील दुसरा स्तर हा विवाहबाह्य सहजीवन (लिव्ह इन रिलेशनशिप), स्त्रीची सृजनाची आस आणि प्रस्थापित मुखवट्यांआडचा भेकडपणा, कृतकपणा अशा मानवी भावनांना स्पर्श करीत जाते; तथापि यातील निर्मला कोरेगावकर ही मुळातच संगीतात– गाण्यात आपलं एकटेपण विसरणारी अशी आहे. त्यामुळे यात जसे वाङ्मयीन संदर्भ-कथानुभवाची निकड म्हणून येतात, तसेच संगीताचे-गाण्याचे संदर्भही त्याच अनुभवाची-व्यक्तिमत्वाची गरज म्हणून येतात.

'शिल्प'मधील 'अमलताश' या कथेसंबंधीही असेच म्हणता येईल. या कथेचा विषय 'ऑटिझम.' नकुल नावाच्या एका तेरा-चौदा वर्षांच्या मुलाची आणि त्या मुलाच्या माणसाची खरे तर ही कथा आहे; पण आजी आपल्या मृत मुलाची उणीव नातवात शोधता शोधता त्याच्यातील गायकाला घडवण्यासाठी धडपडते- एवढे हे असे संदर्भ – संगीताच्या संदर्भात येतात; पण मुळात या कथेचे पेड वेगळे असे आहेत.

कथेची पार्श्वभूमी वा विषय कुठलाही का असेना; अंतिमत: ती कथा माणसांची– म्हणून उभी राहाणं अधिक महत्त्वाचं ठरतं. त्यादृष्टीनं विचार केला तर 'भूप' आणि 'जन्म' या कथा त्या निकषांवर उतरतात. 'भूप'मध्ये मांडणीत आणि नात्यांच्या विणीत काहीसा स्थूलपणा-घटनात्मकता जाणवते, तर 'जन्म'मध्ये हीच वीण अधिक सूक्ष्म, आंतरसंबंधांची मांडणी करणारी ठरते.

मोनिका गजेंद्रगडकर यांच्या या कथाविश्वात परंपरेचे आणि नवतेचे आंतरसंबंध अधिक गहिरेपणाने आलेले आहेत. यातील माणसांची झेप मोठी असेल, उंच असेल; पण त्यासाठी लेखिका या माणसांच्या पायांखाली आपली जमीन उभी करते, हे इथे अधिक महत्त्वाचे आहे. आजच्या जागतिकीकरणाच्या आणि तंत्रविज्ञानाच्या दुनियेत अनेक भारतीय अनिवार्सा म्हणून अमेरिका किंवा तत्सम भांडवलदारी देशांमध्ये स्थिरावलेले आहेत. त्यांच्या संमिश्र जीवनशैलीने आणि मानसिकतेने त्यांच्या जीवनात अनेक प्रश्न निर्माण केलेले आहेत. एकीकडे भौतिक सुखांच्या पाठीमागे धावत असताना या माणसांची मुळंच पार हरवून गेलेली आहेत. त्या मुळांकडे परतण्याची, धाव घेण्याची त्यांची आस आणि भौतिक जीवनाचे, सुखासीनतेचे काच यांत अडकलेल्या माणसांचे चित्रण मोनिका गजेंद्रगडकर 'अनोळखी' (भूप), 'रूट्स' (आर्त) आणि 'धर्म' (शिल्प) या कथांमधून करतात. त्यातली 'धर्म' ही काहीशी वेगळी आहे. मुस्लिम धर्मसंस्कृती आणि इंग्लंडची पार्श्वभूमी असा या कथेचा

विषय आहे. पण यातही प्रस्तुत अर्थाचे प्रश्न काही प्रमाणात जाणवतातच.

'अनोळखी' आणि 'रूट्स'मधून हे प्रश्न लेखिका अधिक आत्मीयतेने आणि कलात्मकतेने मांडू पाहाते. 'अनोळखी'मध्ये दोन पिढ्यांमधील आणि पर्यायाने दोन संस्कृतींमधील विसंवाद लेखिका नेमकेपणाने पकडू पाहाते. बापू हॉस्पिटलमध्ये अतिदक्षता विभागात भरती आहेत. ताराबाई आपल्या परदेशी मुलांना बापूंच्या अखेरच्या भेटीसाठी बोलावते. त्यांची नीना आणि मंदार ही दोन मुलं अमेरिकेत स्थायिक झालेली. नीनाचं मराठी माणसाशी लग्न झालेलं तर मंदारचं पाश्चात्त्य मुलीशी– नॅन्सीशी लग्न झालेलं. नीनाची मुलगी अंजू वयात येते आणि ती लग्न न करताच गरोदर राहाते. ती बेपत्ता होते म्हणून नीना बापूंना पाहायला येऊ शकत नाही. मंदार एकटाच येतो कारण काही महिन्यांपूर्वीच मंदारच्या बायकोनं– नॅन्सीनं– त्याच्यापासून घटस्फोट घेतलेला असतो आणि कोर्टाने मुलाचा ताबा आईला– म्हणजे नॅन्सीला दिला आहे. बापूंच्या आजारपणाचं निमित्त होऊन ही कथा घडत जाते. आयुष्यभर एकमेकांवर जिवापाड प्रेम करणारे, दुखण्या-खुपण्यात एकमेकांना साथ देणारे भारतीय पति-पत्नी आणि केवळ शरीराच्या आकर्षणाने जवळ येणारी आणि ते आकर्षण, त्यातली असोशी संपली की यांत्रिकपणे दूर जाणारी पाश्चात्त्य माणसं यांच्यातील प्रवृत्तीभेद, यातील दुःखार्त ताण या कथेत मांडला गेला आहे.

मोनिका आपल्या कथांमधून पुरुष समजून घेतात. त्यांच्या कथांत कुठेही स्त्री-सद्‌गुणांचा पुतळा आणि पुरुष-दुर्गुणांची खाण असे एकाटलेले चित्र दिसत नाही. अर्थात कोणत्याही चांगल्या लेखनात हे असं एकारलेलं चित्रण येत नाही. तथापि स्त्रीवादी लेखिका मात्र स्त्री ही शोषित आणि पुरुष हा शोषक या ढोबळ संकल्पनांच्या पलीकडे जात नाहीत. या संकल्पनांच्या पलीकडे जाऊन 'माणूस' म्हणून पुरुषाच्याही दुःखाच्या मुळाशी जाण्याचा प्रयत्न 'बाबाची आई'सारख्या कथेतून लेखिका करते हे पाहून वरील विधानाची साक्ष पटल्यावाचून राहात नाही. आई-वडिलांच्या भांडणात– विशेषतः आईच्या 'स्व'च्या भावनेतून उगवलेल्या मतभेदांतून बाप आणि मुलगी यांची होऊ घातलेली ताटातूट– जी कोर्टाच्या शेवटच्या निकालावर अवलंबून आहे. बाबाची मुलीवर– राधावर– असणारी हळवी माया, बाबाचं बुद्धीनं कमकुवत असणं, त्याच्या या अशा बौद्धिक दौर्बल्यामुळं राधाच्या आईची होणारी– झालेली– घुसमट, बाबाच्या खऱ्या आईचा मृत्यू आणि त्यातून या वयातही त्याच्या वाट्याला आलेले पोरकेपण आणि शेवटी बाबाची आई होण्याचा, ती जागा घेण्याचा, निर्णय घेणारी राधा अशा वळणांनी ही कथा घडत जाते. आपला मुलगा मंदबुद्धीचा म्हणून आईनं त्याला शेवटपर्यंत आपल्या पदराखाली सांभाळलं. योग्य वयात त्याचं लग्न करून दिलं. लग्न करून त्याच्या संसारात आलेल्या बायकोला– आपल्या जाणिवांना पुरून उरेल असा हा नवरा वाटतच नाही. मानसिक आणि बौद्धिक दौर्बल्यामुळे तो शारीरिक गरजाही तिच्या पूर्ण करू शकत नाही.. त्यांना मुलगी होते तीही केवळ तिच्या पुढाकारातून– हा असा पुढाकार तिला आपल्या स्त्रीत्वाचा अपमान वाटतो. आपल्या नवऱ्यात कुठलीही निर्णयक्षमता नाही, म्हणून ती वेळीच मुलीला– राधाला– घेऊन वेगळी होते. आपलं आयुष्य मार्गी लावते. मुलीला होस्टेलला ठेवते; आणि मुलीच्या सज्ञान होण्याची व तिच्या निर्णयाची वाट पाहात राहाते. सबंध कथा मुलीच्या– राधाच्या– अंगाने घडत जाते. त्यात तिच्या आईची बाजू येते, वडिलांचं वावरणं येतं आणि पाहता पाहता लेखिका कारुण्याच्या भावनेतून, काहीशा हळवेपणातून वाचकांना या बाबांपर्यंत घेऊन जाते. बाबांचं व्यक्तिमत्त्व, त्या व्यक्तिमत्त्वामागची हतबलता आणि त्यामुळे राधाच्या आईच्या आयुष्याला मिळालेलं वेगळं वळण– अशा या कथाप्रवासात

लेखिका फक्त यातल्या माणसांवर प्रकाश टाकत जाते. आपल्या पात्रांच्या माध्यमातून कुणावरही दोषारोपण करीत नाही वा कुणा एकाची बाजूही घेत नाही. त्यामुळे हे वैशिष्ट्य या कथेचं जसं बलस्थान ठरतं, तसंच ते मोनिकांच्या कथाविश्वाचंही एक बलस्थान ठरतं.

निर्मितीची, सृजनाची तगमग आणि वासना या सनातन नात्याचाही वेगळा अन्वय लेखिका शोधण्याचा प्रयत्न करते. या संदर्भात 'आधार' कथा विवेचनाला घेता येईल. 'आधार'सारखी कथा लिहून मोनिका गजेंद्रगडकरांनी आपली शक्तिस्थळं अधिक प्रभावीपणे अधोरेखित केलेली आहेत. एका नाजूक विषयाची तेवढीच हळुवार, पण धीट अशी ही मांडणी आहे. चित्रकार असलेला अरुण आपल्या मनातल्या अमूर्त चित्राच्या शोधात आहे आणि या सर्जनाच्या तगमगीत असतानाच त्याच्या शारीर-मानसिक धगीचं कुठेतरी विरेचन होण्याचीही त्याला गरज भासते आहे. देवेन हा त्याचा लुळापांगळा भाचा. या भाच्यासोबत त्याचा होणारा शारीर पातळीवरील व्यवहार आणि त्या व्यवहाराची देवेनच्या मृत्यूत होणारी परिणती– असा हा प्रवास आहे. कलेच्या-सृजनाच्या तगमगीशी, त्या धगीशी लैंगिकतेचं आणि मृत्यूचं असलेलं नातं हे सनातनत्व अधिक प्रभावीपणे व्यक्त होतं.

माणसं जगताना, व्यवहारी दुनियेत वावरताना आपापल्या अस्तित्वाच्या सोयीसाठी आपापल्या जागा, आपापली वेटं निर्माण करून ठेवतात. आपापले तीर सांभाळत जगतात. त्या तीरावर जगताना त्यांना सुरक्षित वाटतं. इथलं एकाकीपणही त्यांना सुरक्षितता देऊ पाहातं आणि हाच त्यांचा जगण्याचा खरा आधार ठरतो. हा भाव 'शिल्प'मधून व्यक्त होतो. 'तीर'मधून व्यक्त होतो, तसाच तो 'देणं' किंवा 'अर्थ', 'नाळ'; 'आधार' इत्यादी कथांमधूनही व्यक्त होतो. यातून माणसांचं एकाकीपण, त्यांचं एकाकीपणामुळे निर्माण झालेलं दुःख आणि त्या दुःखाची सोबत करीत जगण्यासाठी त्यांची चाललेली केविलवाणी धडपड समोर येते तेव्हा वाचकही अंतर्मुख होऊन आपापल्या परीने या एकारलेल्या दुःखाचा अर्थ शोधू पाहतात. कथाकार म्हणून मोनिकांच्या अनुभवांचा हा प्रांत एक महत्त्वाचा म्हणून उल्लेखिता येईल.

मराठी आणि मुस्लिम समाजातील मिश्र विवाह, त्या मिश्र विवाहांमुळे विशेषतः स्त्रीच्या भावविश्वात उठलेली वादळे, तिच्या भोवतालचा धर्मांध समाज, धर्माच्या काचामुळे तिचा गुदमर आणि या सगळ्यांची परिणती म्हणून विशेषतः स्त्रीच्या दुःखाला– मग ती कुठल्याही धर्मातली असो– मिळणारे वेगळे आयाम यांचे चित्रण करणाऱ्या मोनिकांच्या दोन दीर्घकथा आहेत, त्या 'श्रद्धा' आणि 'धर्म.' तर तिसरी कथा– 'शरीर'– ही धर्म आणि या धर्मातील माणंसे– विशेषतः पुरुष स्त्रीला मादीच्या पातळीवर, पुरुषी वासनेचा डोंब शमविणारे यंत्र म्हणून कसे पाहतात, याचे विदारक चित्रण करणारी अशी आहे.

धर्माचा मानवी जीवनातला वावर आणि त्यानं आक्रसत जाणारं आपलं व्यक्तिमत्त्व याचा विचार करणारी कथा म्हणजे 'धर्म.' गौतमी इरफान नावाच्या एका मुस्लिम तरुणाच्या प्रेमात पडते. तो मधल्या काळात लंडनला नोकरीला गेलेला. गौतमी आपल्या मैत्रिणीच्या मदतीने लंडनला इरफानकडे निघून जाते. आपलं माहेर, माहेरची माणसं यांना आपल्या प्रेमासाठी तोडून ती इरफानशी लग्न करते; पण या घटनेमुळं इरफानच्या धर्मातील लोक नाराज होतात. गौतमीनं आपल्या धर्मातल्या लोकांची नाराजी दूर सारण्यासाठी तरी आपला धर्म स्वीकारावा. तीन शब्दांचा कलमा वाचायचा. तेवढं झालं की ती मोकळी. केवळ दिखाऊपणा; पण याच प्रवृत्तीला विरोध करते ती इरफानची मम्मी. एक स्त्री दुसऱ्या स्त्रीची भावना, तिच्या अंतर्हृदयातलं दुःख सातासमुद्रापार समजून घेत तिला धीर देते. प्रेम, नव्या पिढीचे भावजीवन,

परस्परांविषयीची ओढ याला धर्म कशाला हवा? यात धर्म कुठे येतो? धर्माचा हा अडसर नव्या पिढीच्या मनात कुठेही नाही; फक्त हा अडसर, हा पीळ जुन्या पिढीच्या मनात मात्र कायमच वसत असतो. जेव्हा संधी मिळेल, जेव्हा परिस्थिती उद्भवेल तेव्हा यांच्या मनातला हा धर्माचा पीळ बाहेर येतो. तो कधी स्वत:साठी तर कधी इतरेजनांसाठी!

'धर्म' किंवा 'श्रद्धा' या कथांमध्ये उच्चशिक्षित, उच्चभ्रू अशा मुस्लिम समाजाचं, त्यांच्यातल्या चालीरीतींचं चित्रण येतं. हा मुस्लिम समाज धर्माचं एक अंग सोडलं तर भारतीय, हिंदू समाजात समरसून गेल्याचं चित्र आपल्याला दिसतं. त्यांच्यात धर्माचं अवडंबर असलंच तर ते त्यांच्या घरापुरतं, त्यांच्या समाजापुरतं. व्यवहारात त्याचे पीळ तसे (धार्मिक अराजकत्वाच्या घटना सोडल्या तर) फारसे दिसत नाहीत, हे लेखिका वेगळ्या अर्थाने नमूद करण्याचा प्रयत्न करते.

मोनिका गजेंद्रगडकरांनी ज्या काळात आपल्या कथालेखनाला सुरुवात केली, तो काळ स्त्रीवादी साहित्याच्या सुगीचा काळ होता. या काळात भल्याभल्यांनी स्त्रीवादाची ढाल हातात घेतली होती; पण नंतर नंतर स्त्रीवादाच्या भारतीय समाजाच्या परिप्रेक्ष्यातील मर्यादा जसजशा स्पष्ट होऊ लागल्या, तसतसा या लेखिकांनी आपल्या शिडाची गती बदलली आणि हळूच त्यांनी आपले तारू जागतिकीकरणाच्या किनाऱ्यावर आणून सोडले. मोनिका गजेंद्रगडकरांचं वैशिष्ट्य हे की त्यांनी कंठाळी स्त्रीवादाच्या काळात स्त्रीवादी भूमिका घेतली नाही आणि पुढे त्या मर्यादा स्पष्ट झाल्यावर जागतिकीकरणाचाही जप सुरू केला नाही. याचा अर्थ सामाजिक स्थित्यंतराच्या आणि मूल्यबदलांच्या या काळात ही लेखिका यापासून दूर होती वा पाठ फिरवून होती, असे मुळीच नाही. तर स्थित्यंतरांच्या आणि मूल्यबदलांच्या या कालखंडाची स्पंदनं ओळखून, ती आपल्यात पचवून शक्य तेवढ्या शांतपणे, तटस्थपणे आणि मनस्वीपणे निर्मितीच्या पातळीवर मांडू पाहत होती.

◇◇◇

**डॉ. रवींद्र शोभणे**
१६, पंचदीप नगर, वर्धा रोड, नागपूर ४४००२५
भ्रमणध्वनी : ९८२२२३०७४३

## वार्षिक ग्रंथपारितोषिके (२६ मे २०१२)

| पुरस्काराचे नाव | पुरस्कार विजेते | ग्रंथाचे नाव |
|---|---|---|
| ह. ना. आपटे पारितोषिक (कादंबरी) | अभिराम भडकमकर | 'असा बालगंधर्व' |
| आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथासंग्रह) | अर्चना अकलूजकर | 'केव्हा तरी पहाटे' |
| म. वि. गोखले पारितोषिक (नाट्यविषयक) | आसावरी इंगळे | 'ऑल इज वेल' |
| रा. ना. नातू पारितोषिक (इतिहासविषयक) | संभाजी भोसले | 'सफर ऐतिहासिक मुंबईची' |
| सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | डॉ. श्यामला वनारसे | 'सत्यजित राय आणि भारतीय मन्वंतर' |
| गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | डॉ. मधुकर ढवळीकर | 'महाराष्ट्राची कुळकथा' |
| शि. म. परांजपे पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | डॉ. श्रीनिवास वेदक | 'महाराष्ट्राचा कंठमणी- डॉ. चिंतामणराव देशमुख' |





अनुक्रमणिका

# धाराशीव — भाषाविष्कारातील साहित्य

- प्रा. अर्जुन व्हटकर

*[कोणतीही 'बोली' ही काळजाची भाषा असते. खरे समाजमन घेऊन ती प्रकट होते. बोलीचा अभ्यास केवळ भाषेच्या शरीरविज्ञानाचा अभ्यास नसून अक्षरवाङ्मय निर्माण करणाऱ्या समाज, संस्कृती आणि भूगोलाचाही अभ्यास आहे. प्रस्तुत लेखकाने धाराशिव-भाषा मध्यवर्ती धरून मराठवाडी बोलीचा परिचय करून दिला आहे. तसेच त्या बोलीचे बोट धरून निर्मिलेल्या साहित्याचाही परिचय करून दिला आहे. शक्य होईल तितक्या दृष्टिकोनातून बोलीवर विचार प्रकट व्हावेत, ह्या उद्देशाने हा लेख. –संपादक]*

माणसाच्या जन्मापासून ते अन्तापर्यंतचं जीवन म्हणजे त्याची भाषा होय. तो ज्या भौगोलिक प्रदेशात राहातो, ज्या सांस्कृतिक जीवनात घडतो, त्या भाषेचा तो स्वीकार करतो. भाषा दोन माणसांना पटकन् जवळ आणते. आत्मीयता निर्माण करते. मानवी जीवनाचा इतिहास होऊन पुढच्यांना प्रेरणा देत राहाते. **माणसाला आपले विचार, अहंकार, विकार विकृती, कृती प्रकट करण्याचे प्रथम साधन म्हणजे भाषा होय.** भाषा ही माणसाच्या जीवनाचा आत्मीय दागिना आहे. ती त्याच्या नसानसांतून रक्तवाहिन्यांसारखी वाहत असते. देहबोलीच्या साहाय्याने आपल्या भावना मुक्रर करणाऱ्या माणसाला जेव्हा कंठ फुटला असेल तेव्हा तो दिवस त्याच्यासाठी किती आनंदाचा असेल. देहबोलीची जागा स्वरभाषेने घेतली. बोलीभाषा प्रादेशिक, भौगोलिक, सांस्कृतिक परिस्थितीत पोसली गेली. तिने बाळसे धरले; आणि मानवाच्या समूहजीवनात रुजली. भारत हा खेड्यांचा देश तसाच कृषिप्रधान देश म्हणून ओळखला जातो. येथे विविध भाषा–भगिनी हातात हात धरून नांदतात. दर बारा कोसांना भाषा बदलते, हा विचार रूढ होत गेला. हे सत्य आहे. प्रत्येक भाषा ही त्या-त्या गटाला वा समूहाला ज्ञात असलेला इतिहास मुखर करते. प्रादेशिकतेनुसार, जातीनुसार काही बोलीभेद असतात. त्याची नोंद साहित्य घेत असते.

मराठवाड्यातल्या उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यातल्या खेडवळ, आणि तत्सम बेरकी, हेकेखोर, नाठाळ, उगरीट, पांचट, उंचट, खारट, तुरट आणि हिरवट तरीदेखील संतांच्या विचारांचा स्पर्श झाल्यामुळे दगडालादेखील पाझर फुटावा अशी माया असणाऱ्या लोकजीवनाची, लोकभाषेची ओळख वाचकांसमोर ठेवण्याचा हा प्रयत्न. माझा रहिवास हा उस्मानाबाद जिल्ह्यातला. जिल्ह्यातल्या भौगोलिक, सांस्कृतिक लोकजीवनाची, लोकप्रश्नांची, लोकभाषेची ओळख वाचकांना व्हावी; हा हेतू! खरे तर, बोली ही गोकुळासारख्या नांदणाऱ्या गाव-गाड्यातल्या चिरेबंदी वाड्यातली गर्तीन सुहासिनीसारखी आहे. तर भाषा ही शहरात-फ्लॅटमध्ये राहाणाऱ्या आधुनिक स्त्रीसारखी आहे. फरक कुंकू आणि टिकलीच्या गडदपणात आहे. बोलीचा गडदपणा माणसाला पूर्णत्व देतो. माणसाच्या जगण्यातील वास्तवाचे सादरीकरण, प्रकटीकरण जर व्हायचे असेल तर त्या-त्या जीवनातील भाषेचा विचार आणि वापर लेखकाला करणे क्रमप्राप्त असते. म्हणून भाषा हा वाङ्मयाचा एक अविभाज्य घटक आहे. भाषा जीवनाचा कणा आहे.

ग्रामीण भाषेचा ऐवज किंवा साज मराठवाड्यातल्या उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यातील लोकजीवनात पाहावयास मिळतो. रानच्या मातीने मळवट भरलेली भाषा आपणास वाचावयास मिळते. माझे जन्मगाव पारा, ता. वाशी (पूर्वीचा कळंब), जिल्हा उस्मानाबाद येथील भाषिक रूपं यातून प्रकट होताना दिसतात.

रानच्या हिरवाईचा वास नाकानं अनुभवणं आणि त्याचं प्रकटीकरण नोंद घेण्यासारखं आहे. या भाषेला एक लकब व हेल आहे. धाराशिव बोली ही त्या परिसरातल्या माणसांच्या काळजाची भाषा वाटते. समाज आणि समाज मानस त्या-त्या बोलींतून व्यक्त होताना दिसतात. या परिसरातल्या बोलीचा बाज हा तर आत्मीय वाटतो. तो वाचकाला अंतर्मुख करतो.

धाराशिव (उस्मानाबाद) जिल्हा म्हणजे दुष्काळाचे सातत्य, कोरडवाहू जमीन. माणसाचं जन्म आणि मरणं यामधलं जगणं म्हणजे ताणतणाव, हालअपेष्टा, सतत अतृप्त आणि दुचक्यात जीवन जगणं. पोटाला ढेकर कधी आलीच नाही. टाफरून तडणी लागूस्तर पोट भरलंच नाही. सतत आभाळाकडं तोंड आणि विठ्ठलाकडं हात जोडून जगणाऱ्या माणसाने परंपरेने व्यक्तिसमूहाने आलेल्या भाषेचा ऐवज नेसून आपले भाषिक जीवन समृद्ध केलेले दिसते. आनंदापेक्षा जिवाचा त्रागाच अधिक आणि तो व्यक्त करण्यातून माणूस कसा वठणीवर येतो, त्याचे वृत्ती विकार लुप्त करण्यासाठी काही स्त्री अन्वयार्थाच्या शिव्यांचा वापर परिस्थितीपरत्वे – त्याही मूल्यगर्भ अशा – जसे–

*'कुठ पासलं पडायला गेलतीस गं आवदसा'*

तसेच पुरुषार्थी शिव्यांचा वापर– ही वैशिष्ट्ये धाराशिव बोलीत पाहावयास मिळतात. याचा संदर्भ जीवन व्यवहारातून खरेपणा, खोटेपणा, देवाण-घेवाण, फसवेगिरी किंवा हारजीत याच्याशी जोडलेला आहे.

*'धर माझा धतुऱ्या'*

माणसाच्या जगण्यातला त्रागा तसेच तोंडसुखाबरोबरच मानसिक आनंद देऊन जाणारी विधानं जनव्यवहारामध्ये सर्रास वापरली जातात. परंतु यातून माणसाचे भंगलेपण नसते, तर यामधून उलटपक्षी आत्मीय जवळीकच दिसून येते. वरेच शिव्या-शाप हे माणसामाणसांप्रती असणारा जिव्हाळा, अधिक लगट, द्वेष, मत्सर, वृत्ती या स्वभावपरत्वे प्रकट होताना दिसतात. हे धाराशिव परिसरातील मानवी पर्यावरणाचं एक द्योतकच आहे. उस्मानाबादजवळ लेण्या आहेत. त्या लेण्यांमधून पाण्याच्या धारा वाहत वाहत पुढे 'गोरोबाचे तेर' या गावी शिवाचे मंदिर आहे, त्या मंदिरातील शिवाच्या पिंडीवर पडतात. म्हणून उस्मानाबादला धाराशिव असे म्हणतात. तसेच धारासुर राक्षसाचा वध देवीने केला म्हणूनही धाराशिव हे नाव, अशी एक जनआख्यायिका आहे. पुढे निजाम राजवटीच्या गुलामगिरीत इथला माणूस नागवला गेला. दीर्घकाळ आंदण दिल्यासारख्या राहिलेल्या या राजवटीत धाराशिवचे उस्मानाबाद झाले.

अशा या धाराशिव परिसरातल्या उघड्या-बोडक्या माळरानावर ज्यांनी अक्षरपेरणी करून मराठी साहित्य समृद्ध केले आणि व्यक्तिपरत्वे, समूहपरत्वे, सीमापरत्वे परंपरेने आलेल्या बोलीला रसिक-वाचक विचार व्यासपीठावर आणले, 'आपूट' बोलीला बाळसे धरायला लावले. बोलीचा कस आपल्या साहित्यातून अधिकच कसदार बनवला, गडद केला. धाराशिव बोलीला वाङ्मयीन प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. यांमध्ये भास्कर चंदनशिव, योगीराज वाघमारे, महावीर जोंधळे, श्रीधर कुलकर्णी, कै. सुहासिनी इर्लेकर, अर्जुन व्हटकर, रवींद्र शिंदे, के. व्ही. सरवदे, राजेंद्र अत्रे, रमेश बोर्डेकर, डी. के. शेख, माधव गरड, ॲड. वा. मा. वाघमारे, मुकुंद कृष्णा गायकवाड, जयराज खुणे, उत्तम लोहकरे अशा लेखकांच्या फळीने भाषा आणि बोलीला मुखरीत केले आहे.

**लेखनसाहित्य :**

धाराशिव परगाण्यातल्या माणसाचं जगणं, त्याची 'रहेन-सहेन,' त्याच्या बोलीची कळा आणि त्याची एकूण प्रतिष्ठाच दृढमूल करते. पिठलं-भाकर, कांदा, हिरव्या मिरचीचा ठेचा किंवा तांबडी भूरकी चटणी, खाराची फोड, मिळालं तर कधी बरबाट. नाहीतर आयुष्यभर नरड्यात तोटरा बसलेला. पाण्याच्या





अनुक्रमणिका

घोटाबरोबर घास गिळून धोतर आणि अंगात बंडी घालून वर्षानुवर्षं धाराशिवची मुरमाड माती पालथी-उताणी करून जीवन जगणाऱ्या कृषक जीवनाची बोली काही लेखकांच्या लेखननिर्मितीतून सहज लक्षात येते.

भास्कर चंदनशिव यांनी आपल्या साहित्यातून बोलीची मांड अधिकच घट्ट केली आहे. भाषिक पातळीवर जगण्याची धग व त्यातील रगेल आणि रंगेलपणाचे प्रगटीकरण मनाचा ठाव घेते. त्यांच्या 'जांभळढव' या कथासंग्रहातील साहित्यमूल्यांच्या अंगाने पुढील मनोगत अधोरेखित करावे असेच आहे.

'नळगुदलेला इक्राळ आंधारय्. व्हक्व्हकता... जिभल्या चाटणारा. आत फाटकं घोंगडं पांघरून दडलेलं कोपट, हाजार हातांचा थयथयाट करणारा मागचा कडूलिंब...सारासारा आंधार ढवळून, गढूळ करणारा. कोपटातली...भडकती चिमणी, तिच्या उज्याडानं दारावाटं काढलेली वळवळती जीभ, लाल पिवळी, दवती-भडकती, अंगण चाटणारी.'

किंवा निवेदनाच्या दृष्टीने असणारी भाषिक वैशिष्ट्ये वाचकाचं लक्ष वेधून घेतात.

'...अशीच एक येडी रात... सुर्व्याचं तरुणपण भोगल्याली, आवसा-पुनवाचं ढवाळं लागल्याली - ती शिश्यारलीय माणसाच्या घाण वासनं आन् येणाटलीय देवीच्या साक्षीनं लांब गावाबाहेरच्या देवळात.'

योगीराज वाघमारे यांची कथा वेगळी वैशिष्ट्ये घेऊन जगते आणि जागवते. त्यांच्या बेगड या कथासंग्रहातून येणारी बोली मराठी साहित्याला एक नवे आत्मभान देते.

"अजून लिवणं झालं नाही का?" कोणीतरी त्या परिस्थितीत अचंब्याचा खडा टाकला. त्या बोलण्याने तो भानावर आला.

"झाले. आता मी नौकरीला असतो."

"झकास झाले. इठुवाचं पांग फिटलं. काय पगार मिळतोय?"

"तीनशे रुपये."

"अबब...मायंदळ पगार हाय." त्या गृहस्थाचा चेहरा फुलून गेला.

अर्जुन व्हटकरांच्या लेखणीला ग्रामजीवनातले प्रश्न वारुळातून मुंग्या बाहेर पडाव्यात तसे बाहेर पडताना दिसतात; आणि माणसाच्या जीवनाला भिरुड लागायची वेळ येते. त्यांच्या कावळ्यांची सुगी कथासंग्रहातून लक्षात येते.

"गुरुजी, झाला का न्हायी अजून फुल्ल पगार? का अर्ध्यावरच डाव चालतोय?"

"नाही. अजून शाळा विनाअनुदानित आहे. सरकारी ग्रॅन्ट मिळाल्यावर व्हईल फुल्ल पगार."

"फुल्ल पगाराची नौकरी बघा. कवर अशा चिंद्या चिवडीता अन् फाटक्या लुगड्याला दंड घालून देता."

"प्रयत्न चालू आहेत."

"आरं, गुरुजी सरकारचं जावई हाईत. म्हंजी सरकारी पगार घेत्यात. तवा सरकारच्या इरुदात कसं बोलत्याल?" टेळ्याचा सर्जेराव म्हणाला.

"ये बेन्या, तुझं व्हटाळंच फोडीन. जीव लहान आन् हुटाच्या गांडीचा मुका घ्यायला जातंय. मधी मधी लुब्रापणा करतंय. गप बस म्हसुबावानी." महिपती बोलला.

रवींद्र शिंदे आपल्या 'तिवडा' या कथासंग्रहातून ग्रामीण भाषेची नवी ओळख करून देतात.

"मालक, दोन मोठ्यांच्या टकरीत माझा गरीबाचा जीव जायचा."

"तू काळजी करायची नाही, मी असताना कोन वाकडं करतोय बघू. महाद्या भराट्यानं, न्हाय का भिमा कोळी अन् जन्या कोतवालाची बायको उबा केली."

धाराशिव बोलीचा गावरान ठसका, परिणामकारक परिसर बोलीचे वेगळेपण आणि तिचे अंतरंग समजून घ्यायला वाचकाला मनाचा भणंगपणा व ठळकपणा

ठेवावा लागेल. कवितेतून येणारी बोलीची वैशिष्ट्ये पाहताना लोकपरंपरेने आलेली लोकभाषा आणि बोली यांचा वापर दर्शवणारी कविता 'पाऊसगाणे, अथांगतेत गुंतूनी, सैतानयुगातील कविता, सपन, व्हावं लगे नवं नवं, पागलपोराच्या भंकस कविता' इत्यादी कवितासंग्रहांतून लक्षणीय लज्जत वाचकांना मिळते.

के. व्ही. सरवदे आपल्या लेखणीतून भाषेला वेगळाच साज चढवतात.

"दे की गं...काही तरी बाई तुला भरणा आलंया! एकलीच खातीया तवापासनं हात आरबाले! एक तीळ सातजणानं वाटून खाल्ला व्हता म्हणं." लग्न झालेल्या आनसानं पोक्तपणाचा आव आणला.

राजेंद्र अत्रेंची कविता जीवनाच्या फरपटीचे चित्र वास्तव रूपात प्रकट करते.

*नदी दुथडी वाहेर*
*घरी रांजण कोरडा*
*घाण चिखल राडीचा*
*समद्या रस्त्याला गराडा*

किंवा डी. के. शेख यांची कविता महात्मा गांधीजींच्या, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या स्वप्नातला भारत कोठे आहे? म्हणून रोखठोक प्रश्न विचारते.

*विसाव्या शतकाच्या झाडाला*
*ही अशी प्रचंड फळं लागलीत बेकारीची*
*अरे कोणत्या च्युत्यांच्या स्वप्नातला*
*भारत निर्मिताय तुम्ही!*

**धाराशिव बोलीच्या शब्दसामर्थ्याची वैशिष्ट्ये**

प्रत्येक भाषेत प्रादेशिकतेनुसार तिच्या उच्चार-विचार, लेखनप्रक्रियेत – स्वरबदल, व्यंजनबदल आणि क्रियाबदल हे निश्चितच असतात. वरील वैशिष्ट्यांनुसार त्यातील शब्दवैभव-म्हणी-वाक्यप्रचार तसेच लिखित वाङ्मय व लोकवाङ्मयाच्या आधारे पाहावे लागेल. कोणत्याही सामाजिक पातळीवर बोलल्या जाणाऱ्या बोलीचा शब्दसंग्रह हाच तिचा ठसा किंवा ओळख असते. बोलीच्या शब्दसंग्रहावरून आपणाला तिचे स्वरूप व वैशिष्ट्ये समजून येतात. 'धाराशिव बोलीतील' शब्दसंग्रह तर मराठवाड्यात असूनसुद्धा उर्वरित मराठवाड्यातल्या बोलीपेक्षा थोडासा वेगळा दिसतो. एवढेच नव्हे तर – विदर्भ, खानदेश, कोकण बोलीपेक्षा ही निश्चितच वेगळी बोली आहे. धाराशिव बोलीचे खरे आविष्करण वैशिष्ट्ये पूर्ण व्यक्त होणाऱ्या आणि जगणाऱ्या तिच्या शब्दसमूहातच आहे; आणि म्हणून प्रमाण भाषा व धाराशिव बोली उद्धृत करणं संयुक्तिक ठरतं.

**वाक्प्रचार**

वाक्प्रचार, म्हणी हे मौखिक परंपरेतून आलेले असतात. मानवी मनाच्या आणि विचाराच्या बांधणीतून ते आलेले असतात. व्यवहारामध्ये-शेती-निसर्ग-सण-उत्सव-कृती जीवन, जन्म-मृत्यू याला अर्थपूर्णता देण्यासाठी केलेली शब्दयोजना म्हणजे म्हणी वा वाक्प्रचार होय. माणसाच्या जीवनाचे तत्त्वज्ञान किंवा सार वाक्प्रचार किंवा म्हणींतून प्रत्ययास येते. वाक्यांना असणारे अर्थ व्यंग, रूढी व रीतिरिवाजानुसार परंपरानिष्ठ संकल्पनेतून आलेले असतात. रेल्वेला दोन डबे जोडले जातात तेव्हा रेल्वे धावते. तद्वतच माणसाचा कार्यकारण भाव आणि स्वभाव यांना जोडणारा दुवा म्हणजेच वाक्प्रचार अथवा म्हणी. त्यांच्या वापरामुळे धाराशिव बोलीला भारदस्तपणा प्राप्त झालेला आहे. धाराशिव बोलीत स्वतंत्र स्थान असलेल्या काही म्हणी व वाक्प्रचार पुढीलप्रमाणे-

काळंकोळसं होणे (वाईट होणे), कोलदांडा घालणे (वाकड्यात शिरणे), बिलामत येणे (संकट येणे), दुचक्यात राहणे (द्विधा मन:स्थिती), पातळलेंडी होणे (खूप घाबरणे), सिदंळकी करणे (व्यभिचार करणे), किवकाकलूत करणे (विनंती करणे), जावतीला ठेवणे

(सुरक्षित ठेवणे), धोपाट्या घालणे (विनाकारण आरोप करणे), टरकून राहणे (भिऊन राहणे), सबुरीनं घेणे (शांततेनं घेणे), रोशन करणे (प्रसिद्ध करणे), राख-रांगोळी होणे (सर्वनाश होणे), वजवाटोळं होणे (सर्वनाश होणे), खुटादावा उपटिणे (काहीच शिल्लक न ठेवणे), बाजींदपण करणे (अनैतिक वागणे), गांड घालणे (गुलामीत राहाणे), खानाखराबा होणे (सर्वनाश होणे), कदरून जाणे (अतिशय त्रासून जाणे).

**म्हणी**

उसनं मांड आन् हांगून काढ (केलेले उपकार लागलीच बोलून दाखवणे).

शिंकं तुटलं मडकं फुटलं आन् बोक्याचं करकदान फिटलं (दोघांच्या भांडणात तिसऱ्याचा लाभ).

सारक्याला वारक्या आन् म्हशीला म्होरक्या (दोघेही एकाच गुणाचे), ज्या गावच्या बोरी त्याच गावच्या बाभळी (एकाची कड दुसऱ्याने घेणे), पांचट फिटलं तीनदा हटलं पर तरी न्हाय वटलं (निरर्थक गोष्ट पटवून सांगण्याचा निष्फळ प्रयत्न), काय बाई हिची तऱ्हा आन् कोंबडी म्हणती मला बिलवर भरा (पात्रता नसतानाही मोठ्या गोष्टीची अपेक्षा ठेवणे), खालतं मुंडकं वरती पाय जलमात येऊन सार्थक काय (प्रयत्न करूनही आयुष्यात काहीच साध्य न झाल्याने जीवन निरर्थक जाणे), अख्यि जिंदगी म्हंजी तीन तिघाडा आन काम बिघाडा (जीवनात कोणतीच गोष्ट योग्य पद्धतीने साध्य न होणे), आली मोठी हातात घोडा आन् पायात तोडा (पात्रता नसताना रुवाब करणे), फुकटचा फोदा आन् झवरं दादा (फुकटच्या गोष्टीला नाही न म्हणणे), ये रं माझ्या म्हागल्या आन् ताक कण्या चांगल्या (परत परत तीच गोष्ट करणे), आंधळं सांगतं भैऱ्याला आन् वाट जाती हिवऱ्याला (कोणत्याच गोष्टीचा ताळमेळ नसल्यामुळे हाती घेतलेले कार्य दुसऱ्याच मार्गाला जाणे), काय तुझ्या जिवाची तलकी सशावर पालकी आन् हळूहळू चालकी (यश संपादण्यासाठी अपयश आले तरी चिकाटी ठेवणे), तट गुणी लट झाली आन् बेंबीखाली गाठ गेली (माजोरीपणातून अविचारी वर्तन), काय बाई आक्रित आन् उलतानं भाकरीत (ऐकावे ते नवलच), खळबळ खुटा आन् जवळनं उठा (खट्याळ प्रवृत्तीपासून दूर राहाणे), तड्या तापडीची आन् वड्या भाकरीची (सतत घाईत असल्याने हाती काहीच न येणे).

**लोकसाहित्य**

परंपरानिष्ठ, रुढीनिष्ठ, संस्कृतीनिष्ठ, देव आणि दैव, नीती-अनीती, निसर्ग आणि मानव यांच्या जीवन-व्यवहाराशी बांधलेला अनुबंध किंवा संयुक्तिक पाठ म्हणजेच लोकसाहित्य होय. प्राचीन काळी जंगलात राहाणाऱ्या आदिवासी लोकांनी-लोकांकडून-लोकांसाठी मौखिक रूपाने रचलेले, गायलेले, सांगितलेले, ऐकलेले लोकगीत, लोकओवी, लोकरूढी, लोकभाव म्हणजेच लोकसाहित्य होय. पुढेपुढे लोकसाहित्याची निर्मिती झपाट्याने झाली. संस्कृतीच्या निर्मितीबरोबर तिचे संवर्धनही होत गेले. लोकसाहित्य जनलोकांकडून-समूहाकडून व्यक्तिपरत्वे आलेले आहे म्हणूनच ते आज अभ्यासाचा विषय बनत आहे.

जात्याच्या पाळूबरोबर फिरणारं जीवन म्हणजे खेडं. खेडं म्हणजे ग्रामसंस्कृतीचं नंदनवन. खेड्यातील रम्य सकाळ, नयनमनोहर निसर्ग, रानशिवारात पक्ष्यांचा किलबिलाट, चिवचिवाट, गुरांचं हंबरणं, गोठ्यातून बाहेर पडणाऱ्या बैलांच्या गळ्यातील घुंगुरमाळांचा आवाज, शेणानी सारवलेली अंगणं, सडा टाकलेला परवार, जनावरांच्या शेणा-मुताचा येणारा वास, पिकानं डोलणारं शिवार, त्याच्या सान्निध्यात रमणारी ग्रामसंस्कृती.

खेड्यातील संस्कृती, सण, उत्सव. कधी कधी

दिवसाच्या प्रहरानुरूप, कालगणनेनुरूप, लोकरुढी, देव-दैविकांच्या प्रथा, व्रतवैकल्यं, भ्रमसंकेत, संदर्भ व संबंध, लोककथा, लोकजागर, लोकगीतं, जन्म-मरणाच्या फेऱ्याचा, पशु-पक्ष्यांच्या आवाजावरून निघणाऱ्या संकेतांचा, झाडे-झुडपे असण्या-नसण्याच्या अनादी काळापासून चालत आलेल्या गोष्टी या सर्वांभोवती गुरफटलेला, खेड्यातला अज्ञानी, निरक्षर, दिलदार, उमद्या मनाचा माणूस.

जातं म्हणजे गाता गळा. या जात्यावर सासुरवाशिणीला होत असलेला सासुरवास अन् वाऱ्या-पावसात, रानावनात, साऱ्या शिवारात शेती-वाडीची, सुगीची-काट्या-कुपाट्यांच्या वाटा तुडवत करावी लागणारी कामं, जीवापाड कष्ट, हळुवार वाऱ्यासारखा सतत मनाला माहेरच्या आठवणीचा स्पर्श, जन्मदात्या आई-बापाचा मायेचा ओलावा, कळत्या वयापासून आयुष्याच्या चढ-उताराच्या पायऱ्या, नवरा, भाऊ, मुलगा यांच्या प्रेमाचे पदर – कधी विरह-विकार-आनंद, सासरची नाती, माहेरची नाती यांची न उसवणारी घट्ट वीण. यातून येणारा मनाचा उसमारा-उदासीनता, आसक्ती-गोडी-हव्यास-प्रेम-माया-भक्ती या सर्व अनुभवांचं साचलेपण ती जात्यावर दळताना आपल्या गोड गळ्यातून व्यक्त करते. कारण आपले आयुष्य म्हणजे जातंच आहे, यातून आपली सुटका नाही. जातं फिरतं म्हणजे संसारचक्र फिरतं तसंच ऋतुचक्रासारखं आयुष्य फिरतं. जात्यावर दळण दळणं हा केवळ मनाचा विरंगुळा किंवा श्रमपरिहाराचा भाग नसून दगडाचं जातं ही जीवनाची प्रतिमा आहे. ते फिरलं म्हणजे संसार आणि जीवनचक्र फिरत आहे असा भाव त्यातून व्यक्त होताना दिसतो.

**ओव्या -**

*जातं मी वडीते जसं हारण पळतं*
*माता माझ्या गौळणीचं दूध मनगटी खेळतं*

*उगवला नारायण आधी उगवं माझ्या दारी*
*मग पिर्थीम धुंडं सारी*

*नदिच्या पल्यांड गं बेट फुललं लव्हाळ्याचं*
*बधुजी राजस मला भेटलं जिव्हाळ्याचं*

*आयेव मेली नार जन म्हणती बरं झालं*
*बोलतो भरतार माझ्या कंठीचं सोनं गेलं*

*आयेव मरणाची बाई मला हावूस*
*म्होरं चालं कंत म्हागं गोताची फौज*

*पाटी पुस्तकान चार भरले रांजनं*
*नेणत्या राघुनं म्हागं सारीले बामण*

**उखाणे-**

गाव खेडं कळवातनीचा महाल येशीपूढं
स्वामी झालं येडं स्वामीला लागला वऱ्हाडाचा छंद
तिथं घेतले बाजुबंद बाजुबंदाला गोंडं
पिवळी पचरगीदंड परत गेले बारसिला
बारसित घेतली गादी छतरंजी
गादी इनली झिणकारी
परांड्याचा सुतार फार कारागीरी
निक्या पलंगाला दिलं पन्नास रुपये
पलंग आणला घरा, कळवातीन घाली वारा
तिथं घेतलं शहरच पिठ, तिथं घेतला चंद्रहार
त्याचं सोनं अशीलदार
घडाय लागलं तीन वार
घडण मोठी नक्षीदार
तिथं घेतली जाऊमाळ
तिथं घेतली बोरमाळ
परत गेले सराफाच्या माडी
हाजाराच्या घेतल्या बुगड्या
बुगड्या टाकल्या खिशात
गेले कानाडी देशात



अनुक्रमणिका

तिथं घेतली मलमली पैठणी
पैठणीचा रंग फिका
फिका रंग आणू नका
वाकड्या नथला दुहेरी फासा
परत गेले बंगालदेशा
तिथं घेतल्या मोत्याच्या पाच मुठी
उतरले समिंद्राच्या काठी
पहिला मुक्काम कुठं मिरगसरी पेठ
चौकडं चार पदरं लावूनी गजरं
दुसरा मुक्काम कुठं, हामदाबाद पेठ
हातात तोडा बसाय घोडा
तिसरा मुक्काम कुठं धाराशिव पेठ
तिथं घेतली टिक टिक बसविली नथाला
सोबा आली कुडकाला
खळणी अंगी मलमली शालू
सर्व बाजार ना बाजार केला
एवढा तकट कोणी केला
कळंबाच्या सराफानी केला
कळंबाच्या सराफानी काढलं आगनगाडीचं तिकिट
आगनगाडी पळ वाऱ्याच्या परोपरी
स्वामी आलं म्हणून पत्र धाडिते देशावरी
इसान पाणी कर गं घंगाळी, झाली भोजनाची तयारी
..........रावांचं नाव घेते
जडावाचं मंगळसूत्र राहिलं तुळजापुरी!

**भलरीचा गोडवा**

*आयनावती का मैनावती*
*गाडी पुण्याला जाती*
*बापुजी का दाजीबाची*
*भलगडी दादा भलरं*
*अरं होऽ होऽ गवळी रामा भलरं*
*भलगडी दादा भलरं...*

*आटारगाड्या मोटारगाड्या गेल्या पंधरा*
*हितून तिथून रोड पडला बोरिबंदरा*
*बोरिबंदर भाय तिथं खिळा कोकणी*
*माटुंग्याच्या बोगद्यात गाडी रोकली*
*भलगडी दादा भलरं*
*अरं होऽ होऽ गवळी रामा भलरं*
*भलगडी दादा भलरं...*

**संदर्भ**


१. भास्कर चंदनशिव : 'जांभळढव' – लोकवाङ्मय ग्रह. प्रा. लि. मुंबई-४, प्रथमावृत्ती– मार्च १९८०.
२. अर्जुन व्हटकर : 'तुंबण' – स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती– ११ जून २००६.
३. अर्जुन व्हटकर : 'कावळ्यांची सुगी' – स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती– २५ मार्च २०१०.
४. डॉ. द. ता. भोसले : प्रस्तावना – 'कावळ्यांची सुगी' ले. अर्जुन व्हटकर, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद.
५. योगीराज वाघमारे : 'वेगड' – हर्ष प्रकाशन, उस्मानाबाद, प्रथमावृत्ती– डिसेंबर १९८०.
६. राजेंद्र अत्रे : 'पाऊसगाणे' – विकास प्रकाशन, उस्मानाबाद, प्रथमावृत्ती– १९९७.
७. अर्जुन व्हटकर : संपादित 'लोकसंस्कृतीच्या वळदातलं धन' – स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती– २६ जानेवारी २०११.
८. रवींद्र शिंदे : 'तिवडा' – प्रकाशक तुकाराम वनसोडे, प्रथमावृत्ती– ९ सप्टेंबर २००४.
९. के. व्ही. सरवदे : 'काळोखगर्भ' – प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती– १९७७.
१०. डी. के. शेख : 'पागल पोराच्या कविता'.


❖❖❖


**प्रा. अर्जुन व्हटकर**
(ग्रामीण कथाकार)
लतादेवी नगर, प्लॉट नं. ३४/२४,
हुच्चेश्वर मठाजवळ, कुमठानाका,
सोलापूर - ४१३ ००३.
भ्रमणभाष : ९४२३५९३४३१.
निवास : ०२१७-२६००१६७.





अनुक्रमणिका

कै. का.र.मित्र व्याख्यानमाला

# प्रसार माध्यमांची भाषा

*[हावभाव, चिन्हे, चित्रकला, शिल्पकला, संगीत आणि साहित्य इ. अनेक मार्गांनी भाषा ती व्यक्त होत आली आहे. भाषांतर-रूपांतराची भाषा, पत्रव्यवहाराची भाषा, दस्तऐवजाची भाषा, वाद-विवादाची भाषा, आरोपाची आणि कैफियतीची भाषा, शुद्धाशुद्ध भाषा, वक्तृत्वाची आणि प्रमेय मांडणीचीही भाषाच! अठराव्या शतकात प्रसारमाध्यमांची भाषा अस्तित्वात आली; आणि कालौघात भाषा व्यक्त होण्यासाठी वृत्तपत्रे, आकाशवाणी, दूरदर्शन ही प्रभावी माध्यमे अधिकार गाजवू लागली आहेत. प्रत्येक माध्यमांनी आपापले बरे-वाईट संस्कार भाषेला दिले. प्रत्येक वेळी बऱ्या-वाईटावर चर्चा किंवा संघर्षही झाले. भाषा शुद्धिकरणाचे प्रयोगही झाले! आता तर भ्रमण-भाष-यंत्रावरील 'एस.एम.एस.'ची भाषा आपला प्रभाव गाजवू लागली आहे; आणि आकाशवाणीवरील 'रेडियो-मिर्ची'?*

*बहुविध संस्कार पचविण्याची क्षमता भाषेत आहे. बाह्य संस्कार स्वीकारताना भाषेची अस्मिता अस्वस्थ होते. भाषेच्या भवितव्याची चिंता करू लागते. कधी ऊर्दू-फारसीचा प्रभाव, कधी आंग्ल भाषेचा तर कधी जागृत होत असलेल्या विविध संस्कृतींचा भाषाप्रभाव स्वीकारून भाषेचा ओघ हा, संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश, मागधी, अर्धमागधी इत्यादी मार्गांनी, सगळे संस्कार स्वीकारीत वाहतो आहे. हा भाषा-स्वभाव कुणालाही रोखता आलेला नाही; कारण तो प्रत्येक बदल जीवनावश्यक होता; आणि असेलही!*

*साहित्यपरिषदेने कै. का. र. मित्र-व्याख्यानमालेत–वृत्तपत्रातील मराठी, आकाशवाणी आणि मराठी भाषा तसेच दृक्‌श्राव्य माध्यमांपैकी 'चॅनलवाल्यांची मराठी' अशा तीन संस्कारक्षेत्रांशी निगडित असलेल्या व्याख्यात्यांना आपले विचार मांडण्यासाठी आमंत्रित केले होते. त्यांचे विचार लिखित-स्वरूपात अभ्यासार्थ प्रकाशित करीत आहोत–*

*श्राव्य– दृकश्राव्य आणि मुद्रिते ह्या क्रमाने भाषेने स्वीकारलेले संस्कार कसे होते-आहेत व असतील ह्यांची चर्चा होणे आवश्यक आहे; म्हणून; म.सा.पत्रिकेने हे भाषासंस्काराचे स्वतंत्र दालन उघडले आहे. अभ्यासकांच्या विचारांचे स्वागत होईल.*

*– संपादक]*

---

## आकाशवाणी : मराठी भाषा (श्राव्य-माध्यम)

–विनया मेहेंदळे

आज प्रसारमाध्यमांचे युग आहे. आपल्या दैनंदिन आयुष्याशी ही सगळी माध्यमे निगडित आहेत. त्यामुळे सगळीकडे गलबला दिसतो आहे. जाहिराती — त्यांचे अर्थकारण, मनोरंजनाचा धडाका, मतमतांतरे, घडल्या-घडवल्या जाणाऱ्या घटना हे सगळे बघताना 'आकाशवाणी' या माध्यमाचे वेगळेपण निश्चितच जाणवते.

मुळामध्ये आकाशवाणी हे मनोरंजनासाठीचे माध्यम नव्हते तर माहिती, ज्ञान, लोकशिक्षण याला प्राधान्य देणारे होते. देश नुकताच स्वतंत्र झाला होता. शिक्षणाचे प्रमाणही मोठे नव्हते अशा वेळी या 'श्राव्य' माध्यमाची ताकद ओळखून पंचवार्षिक योजनांमध्ये त्याचा समावेश होता.

आकाशवाणीच्या सुरुवातीच्या कालखंडात अनेक साहित्यिक आकाशवाणीच्या सेवेत होते. अगदी पु. ल. देशपांडे, बा. भ. बोरकर, व्यंकटेश माडगूळकर, द. मा. मिरासदार, शंकर पाटील ही यादी खूप मोठी आहे. त्यामुळे आकाशवाणीची 'भाषा' ही कायमच





अनुक्रमणिका

दर्जेदार होती. एकप्रकारे चांगल्या भाषेचा पाया आकाशवाणीत घातला गेला असे म्हटले तर वावगे होणार नाही. त्यामुळेच इतरत्र जरी भाषेचे धिंडवडे निघाले तरी 'आकाशवाणी'त ते होणार नाहीत; याचा विश्वास लोकांच्या मनात निर्माण झाला. आजही एखादा नवखा निवेदक चुकीचे बोलला तर हे तुमच्याकडून अपेक्षित नाही, अशी प्रतिक्रिया सर्वसामान्यांकडून उमटते.

आकाशवाणी हे 'श्राव्य' माध्यम आहे. त्याच वेळी ते 'आंधळे' माध्यम आहे. दुसरी गोष्ट एकीकडे हातांनी दुसरे काम चालू असताना ते ऐकले जात असते. सर्व कामे टाकून दूरदर्शनपुढे बसून तो कार्यक्रम ऐकला जात असतो. आकाशवाणीचे तसे नाही. दुसरी गोष्ट रेडिओचे बटण बंद करणे श्रोत्याच्या हातात असल्याने आकर्षक कार्यक्रम करत असताना भाषा सोपी, अल्पाक्षरी आणि पटकन लक्षात येईल अशी हवी. वाक्ये छोटी हवीत. लांबच लांब, बोजड शब्दांची वाक्ये डोक्यावरून जातील. दुसरी गोष्ट केवळ 'ध्वनी' माध्यम असल्याने आवाजाची विविधता, संगीत यांचा योग्य मेळही हवा.

हे माध्यम 'आंधळे' असल्याने श्रोत्यांच्या मनात ध्वनिचित्र कल्पनाशक्तीने तयार होत असते. त्यामुळे ज्याला आकाशवाणीसाठी लिखाण करायचे आहे त्याने भरपूर ऐकायला हवे. आपण जे ऐकत आहोत त्याचे मनात काय चित्र उमटते आहे याचा आपला आपणच शोध घेतला, तर 'ध्वनिचित्रांची' ही भाषा आपोआपच यायला लागेल.

अब्दुल कलाम यांनी एके ठिकाणी म्हटलंय, 'आपल्याकडे लिहायला, वाचायला शिकवतात; पण कसे ऐकावे हे शिकवले जात नाही. आकाशवाणीचा संस्कार चांगले ऐकवण्याचा आहे. त्यामुळे इथली भाषाही सुसंस्कृत आहे. 'हटके'च्या नावाखाली शिवराळपणा येणार नाही. लोकांना आकर्षित करण्यासाठी भाषेची तोडमोड होणार नाही. लोकांना शिकवणे, चांगले त्यांच्यापर्यंत पोहोचवणे हे काम आकाशवाणीने केले आहे.'

आकाशवाणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे– 'वेळ'! इथे बोलले जाणारे वाक्य, मधला पॉज याचे पुरेपूर भान असले पाहिजे. अचूकता आणि वेळेचे भान यामुळे शब्दांचा नेमकेपणा हवा. पाल्हाळपणा, जडजंबालता यांना इथे जागा नाही. याचे आदर्श उदा. 'चिंतन'सारखा आकाशवाणीचा सकाळचा पाचच मिनिटांचा कार्यक्रम. हे चिंतन ऐकल्यावर दिवसभर मनात तो विचार राहावा, ही कल्पना. विचारप्रवर्तक असा हा कार्यक्रम असला तरी सोपी भाषा, नेमके शब्द यातून तो पोहोचतो. व्यंकटेश माडगूळकरांनी हा कार्यक्रम सुरू केला. तो इतका लोकप्रिय झाला की त्याची वेळ वाढवावी, अशी सूचना अनेकांनी केली. त्यावर माडगूळकरांचे उत्तर मार्मिक होते. होमिओपॅथीच्या गुण येणाऱ्या गोळ्या साबुदाण्याएवढ्याच असतात. त्याचा आकार बेसनाच्या लाडवासारखा करून चालत नाही. आकाशवाणीवर कितीही चांगला वक्ता असला तरी भाषण १० ते १५ मि. पेक्षा अधिक काळ कंटाळवाणे बनणार. त्यामुळे तो विषय स्पष्टपणे तेवढ्याच वेळात मांडला गेला पाहिजे. 'नमनाला घडाभर तेल' इथे चालणार नाही. उलट विषयाला लगेचच हात घालायला हवा.

भाषेच्या बाबतीत विचार केला तर एकाच वेळी विविध वयांच्या, विविध स्तरांतल्या, विविध आवडीच्या लोकांपर्यंत हे माध्यम जात असते याचेही भान कायम ठेवायला हवे. बऱ्याच जणांचा 'ण' ला 'न' म्हणजे म्हणजे 'ग्रामीण' भाषा असा भ्रम असतो. ग्रामीण भाषेची ही अनेक वैशिष्ट्ये आहेत. जो कार्यक्रम जे श्रोते ऐकणार आहेत त्यांची आवड, त्यांची भाषा याची जाणीव हवी, अशुद्ध म्हणजे ग्रामीण नव्हे! शेतकऱ्यांच्या कार्यक्रमात त्यांना समजतील अशा भाषेत, त्यांच्या भाषेत मांडणे हे कौशल्य आहे. बोलीभाषा वापरत असताना त्या भाषेचीही

श्रीमंती आहेच, तिचाही अभ्यास हवा.

आकाशवाणीतले काही कार्यक्रम विशिष्ट गटांसाठी असतात. त्या वेळी त्या गटांना काय सांगायचे आहे, आपल्या कार्यक्रमातून त्यांच्यापर्यंत काय पोहोचवायचे आहे याची सुस्पष्ट कल्पना हवी. उदा. युवकांसाठी, महिलांसाठी, लहान मुलांसाठीचे कार्यक्रम. हे कार्यक्रम ज्यांच्यासाठी आहेत त्यांच्या वापरातली भाषा त्या कार्यक्रमात येईल. त्यांच्यासाठी मांडले जाणारे विषय त्यांना समजतील अशाच शैलीत हवेत. याच वेळी वर्तमानाशी संबंध हवा; आणि बाहेर घडणाऱ्या घटनांचेही भान हवे.

लिखाण करत असताना आपण वर सांगितल्याप्रमाणे 'व' असे शब्द येतात. हे शब्द इथे वापरून चालणार नाही, त्यापेक्षा 'याआधी सांगितल्याप्रमाणे' वापरले जाईल, नाही तर ते 'भाषण' न राहाता लिखाणाचे वाचन होईल. केले, सांगितले पेक्षा केलं, सांगितलं असा वापर होईल. या आणि अशा गोष्टी वरवर क्षुल्लक वाटल्या तरी महत्त्वाच्या आहेत.

आकाशवाणीवरून 'breaking news' किंवा विवाद्य विषय याला स्थान नाही. त्यामुळे 'टीका' असली तरी ती व्यक्तीवर असणार नाही. याचे उदा. डॉ. गं. ना. जोगळेकर. यांनी एका अनुभवातून सांगितले होते. एका पुस्तकाचे परीक्षण करताना त्यांनी कडाडून टीका केली होती. त्यावर माडगूळकरांनी त्यांना सांगितले होते, 'तुमचा मुद्दा रास्त असला, तरी इथे त्या लेखकाला बाजू मांडता येत नसल्यामुळे काही वाक्ये बदलली पाहिजेत.' या माध्यमाचे हे वैशिष्ट्य आहे म्हणूनच आकाशवाणीमुळे समाजात 'अशांतता' निर्माण केली नाही. पण प्रभावी सौम्य भाषाही परिणामकारक ठरू शकते, याचा प्रत्यय दिला.

साहित्याबाबत आकाशवाणीने केलेले मोलाचे काम म्हणजे उत्तमोत्तम कलाकृती श्रोत्यांपर्यंत नेल्या. आकाशवाणीवरून क्रमशः वाचन झालेली अनेक पुस्तके लोकांनी आवर्जून आणून वाचली. लोकांमध्ये चांगले वाचले जावे हा संस्कार आकाशवाणीने केला आहे.

यामध्ये सर्वांत उल्लेखनीय उदाहरण आहे गीतरामायणाचे. आकाशवाणीच्या माध्यमातून एक 'अजरामर' कलाकृती निर्माण झाली. याचे वैशिष्ट्य म्हणजे दोन दिग्गजांचे त्यांच्या कलेवरचे प्रभुत्व! ग. दि. माडगूळकरांसारख्या शब्दप्रभूची भाषा — 'पराधीन आहे जगती'सारखे तत्त्वज्ञानावरचे गीत केवळ रेडिओवर ऐकून त्यातल्या ओळी इतक्या भिनल्या की, आमच्या शाळकरी निबंधातही सहजगत्या वापरल्या जात होत्या. 'श्राव्य' माध्यमही किती प्रभावीपणे पोहोचते याचा तो उत्कृष्ट नमुना आहे.

आकाशवाणीवर काम करणारे निवेदक — त्यांचे उच्चार, भाषा यांबाबतही जागरूक असतात. विशेषतः इतर ठिकाणी दोन गाण्यांमधले निवेदन हे अगदी निरर्थक, बाष्कळ असले, तरी त्याबाबत जागरूकता दिसत नाही. उलट त्या गाण्यांमधले सौंदर्य, भाषा, अर्थ, संगीताचे वैशिष्ट्य सांगणारा 'महक'सारखा कार्यक्रम गाण्यांप्रमाणेच निवेदनासाठीही ऐकला जातो. हाच अनुभव हा 'phone in' किंवा इतर कार्यक्रमांत येतो.

आकाशवाणीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे 'विश्वासार्हता'. इथे वापरला जाणारा शब्द न् शब्द विचारपूर्वक वापरला जातो. त्यामुळेच 'रेडिओ'वर ऐकले म्हणजे ते १०० टक्के खरे आहे याची खात्री जनमानसांत आहे. ऐकीव बातम्या किंवा वरवरचा 'time pass' नसल्याने माध्यमाचे गांभीर्य जाणणारे, जबाबदार असे हे माध्यम आहे. संस्कार करणारे, चांगले शिकवणारे, आपल्या तक्रारींना वाचा फोडणारे, पण प्रश्नांना उत्तरे शोधणारे, मार्गदर्शन करणारे असे हे विधायक प्रसारमाध्यम आहे. त्यामुळेच त्याची भाषा सोपी, नेमकी, अचूक आहे.

◇◇◇

**विनया मेहेंदळे**



अनुक्रमणिका

(दृक्-श्राव्य माध्यम)

# या 'चॅनलवाल्यां'ची मराठी म्हणजे..

– प्रसन्न जोशी

(प्रोड्युसर- स्टार माझा Paanjsigalcm)

मराठी भाषेच्या वैयक्तिक आणि मराठी वृत्तवाहिनीत काम करणाऱ्या वापरकर्त्यांची ही मनोगते. याबद्दलच मी महाराष्ट्र साहित्य परिषदेनं आयोजित केलेल्या मनोरंजनकार 'कै. का. र. मित्र व्याख्यानमालेत इलेक्ट्रॉनिक माध्यमातील मराठी भाषा' या विषयावर बोललो होतो. या लेखाच्या निमित्तानं माझं तेव्हाचं बोलणं अधिक स्पष्ट करण्याची आणि काही राहिलेले मुद्दे नव्यानं समाविष्ट करण्याची संधी मिळाली आहे.

वृत्तवाहिन्यांवरील मराठी भाषेबद्दल काही सांगण्यापूर्वी या माध्यमातील भाषा कशी आहे; हे अन्य प्रमुख वृत्तमाध्यमांतील भाषेच्या वापराच्या अनुषंगानं सांगितलं पाहिजे. वृत्तपत्र हे त्यानुसार पहिलं मराठी मुद्रित वृत्तमाध्यम. त्यानंतर येतो रेडिओ. इथं ऐकली जाणारी मराठी भाषा आहे. याच्या पुढची पायरी दूरचित्रवाणी इथं वाचली, ऐकली, शिवाय पाहिली जाणारी मराठी भाषा आहे. इंटरनेट हे तर बहुमाध्यम आहे. पण, माझं निरीक्षण असं आहे की, अन्य माध्यमांप्रमाणे इंटरनेटवर किंवा त्यातही न्यूजबेस्ड वेबसाईट्सची मराठी भाषेची वेगळी शैली नाहीये. तिथे अजूनही वृत्तपत्रीय मराठीच जाणवते.

या छोट्याशा परिचयानंतर इलेक्ट्रॉनिक वृत्त-वाहिन्यांमधील ('मीडिया' शब्द फार ढोवळपणे वापरला जातो. तमाशा, भूपाळी, लावणी, शाहिरी हेही 'मीडिया'च आहेत.) मराठी भाषेची स्थिती, आक्षेप–आणि अपेक्षांकडे डोळसपणे पाहाता येईल. वर म्हटल्याप्रमाणे वृत्तवाहिन्यांवरची मराठी वाचली, ऐकली; शिवाय पाहिली जाणारी मराठी भाषा आहे. म्हणजेच हे दर्शकांच्या दृष्टिकोनातून होणारं आशयाचं ग्रहण आहे. तसंच, या माध्यमात काम करणाऱ्यांच्या दृष्टिकोनातून ही भाषा लिहिली, बोलली आणि पाहिली जाणारी मराठी भाषा आहे. या पाहाण्याच्या ठिकाणीच मराठी न्यूज-चॅनलमधील मराठी भाषेचं वागवलं जाणं लक्षात घ्यावं. कल्पना करून पाहा की, दिवाळीच्या दिवसांत मराठी न्यूज चॅनलचे अँकर ब्लेझर आणि टाय आहेत. काही खटकतंय का? किंवा गणेशोत्सवाच्या मिरवणुकीचं वार्तांकन करणारी रिपोर्टर चेहऱ्यावरची रेषाही न हलवता मिरवणुकीतल्या जल्लोषाबद्दल सांगतेय. काही चुकतंय का? भाषेचा आणि संस्कृतीचा थेट आणि सेंद्रीय संबंध असतो हे लक्षात घेतलं तर काय खटकतंय आणि काय चुकतंय, हे तुमचं तुम्हालाच लक्षात येईल.

या अर्थानं मराठी न्यूज चॅनलवरची मराठी परिधान किंवा वागवली जाणारीही आहे; असं मला वाटतं. सध्याच्या २ तास चालणाऱ्या मराठी न्यूज चॅनल्समध्ये मराठी भाषा या मितींमध्ये (गेद) सारखी फिरत असते. याशिवाय, मराठी वृत्तवाहिन्यांमधील संपादकीय विभागातील माणसांचा मराठीचा वापर, वृत्तनिवेदकांची मराठी, बातमीदारांची मराठी, प्रसंगोत्पात कार्यक्रमासाठी येणाऱ्या, पत्रकार परिषदा घेणाऱ्या किंवा प्रतिक्रिया देणाऱ्या लोकांची मराठी असा हा मराठी वृत्तवाहिन्यांतील मराठी भाषेचा व्यवहार.

या पार्श्वभूमीवर मराठी वृत्तवाहिन्यांवर मराठी भाषेच्या वापराबाबत दोन प्रकारचे आक्षेप घेतले जातात.पत्रकारितेत वृत्तमाध्यमांसाठी भाषेच्या वापराबद्दलचे नियम आणि संकेत पाळले जात नाहीत हा पहिला आक्षेप. तर, एकूणच मराठी न्यूज चॅनलवरील भाषा इंग्रजी–भेसळयुक्त, व्याकरणाच्या दृष्टीनं अनेकदा अशुद्ध लिहिली जाणारी, चुकीचे उच्चार किंवा शब्दप्रयोग

आढळणारी हा दुसरा ढोबळ आक्षेप. हे दोन्ही आक्षेप अधिक गुंतागुंतीचे ठरतात. कारण, ते एकमेकांत मिसळलेल्या स्वरूपात आढळतात. या स्थितीला कारणीभूत ठरणारा प्रमुख घटक आहे, या माध्यमाचं 'लाईव्ह' असणं. उदा. एखाद्या ग्रामीण भागातील नेत्याची प्रतिक्रिया वर्तमानपत्रात येते, तेव्हा त्या नेत्याची भाषा ग्रामीण ढंगाची आणि तथाकथितदृष्ट्या अशुद्ध असली, तरी त्या प्रतिक्रियेवर संपादकीय संस्कार उपसंपादक करतात, तेव्हा तुमच्यासमोर दुसऱ्या दिवशी (अवधीही महत्त्वाचा आहे) त्या नेत्याची (आयुष्यात न वापरलेल्या) प्रमाणभाषा मराठीतील प्रतिक्रिया वाचायला मिळते. पण, हेच लाईव्ह असणाऱ्या मराठी वृत्तवाहिनीत करणार कसं? याच लाईव्ह घटकामुळेच अनेकदा व्याकरणाच्या चुका, अँकर बोलत असताना उच्चारांच्या चुकाही आढळतात (गडबडीच्या वेळी किंवा 'ब्रेकिंग न्यूज'च्यावेळी आपण दिसत असतो, याचाही ताण 'अँकर'वर असतो. हा ताण नुसत्या बोलण्यापेक्षा अधिक असतो). तुलनेनं रेडिओमध्ये ('लाईव्ह' माध्यमच आहे) इतरांच्या प्रतिक्रिया सोडल्यास, बाकी भाषेच्या वापराची मदार प्रामुख्यानं वृत्तनिवेदकावरच असते. ऐनवेळीदेखील संहितेतील चुका रेडिओतील वृत्तनिवेदिका दुरुस्त करू शकते. शिवाय बातम्यांसाठी नभोवाणी हे अजूनही सरकारी माध्यम आहे. खासगी वृत्तवाहिन्यांमध्ये बातम्यांवर ज्या प्रकारे काम केलं जातं तो वेग, ती तिथे नसते आणि तो त्यांच्या नियमांचा भागही आहे. हे चुकांचं समर्थन नाही. मराठी इलेक्ट्रॉनिक वाहिन्यांच्या स्थितीचं आकलन आहे. ज्या गोष्टी हातात आहेत; त्याबाबत आम्ही माध्यमकर्मींनी प्रयत्नपूर्वक चुका दुरुस्त केल्या पाहिजेत हे मी मानतोच. या स्पष्टीकरणात पत्रकारितेची मूलतत्त्वं, नियम-अनेकदा इलेक्ट्रॉनिक वृत्तवाहिन्यांत पाळले जाताना दिसत नाहीत. या आक्षेपाचा प्रतिवाद केलेला नाही. कारण, तो एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.

इथं आपण भाषेच्या चुका परिस्थितीजन्य कशा आहेत ते पाहिलं. पण, मुळातच वृत्तवाहिन्यांवर भाषेबाबतचा मुख्य आरोप आहे, तो मराठी प्रमाण किंवा अभिजात-भाषेचा काटेकोर वापर न होणं हा. प्रामुख्यानं वृत्तपत्रीय भाषेच्या अनुषंगानं हे आक्षेप नोंदवले जातात. यात लिहिणं, बोलणं, वाचणं हे आलंच. उदाहरणार्थ, गोची, लोचा या शब्दांचा वापर. इंग्रजी, हिंदी शब्दांचा वापर किंवा चुकीचे उच्चार, ग्राफिक्सवरील लिखित वाक्यं, शब्दांतील व्याकरणाच्या चुका. मी मुळात इथं माझ्यापुरता मान्य करतोय की, भाषा व्यवहारासाठी व्याकरणाचा पाया आवश्यक आहेच. पण,भाषेच्या वापरावर बंधनं लादता येत नाहीत. आतापर्यंतचा होत आलेला प्रमाण मराठी भाषेचा व्यवहार हा पुण्या-आणि तत्कालीन अभिजन वर्गाच्या मंडळींनी घडवलेला, नियमबद्ध करत आणलेला आहे. याबद्दलचा एक छोटासा किस्सा सांगून पुढे जातो. पुण्यात एकदा कुणी कृषिभूषण डॉ. पंजाबराव देशमुखांना म्हटलं, तुमची भाषा किती अशुद्ध आहे त्याला तत्काळ उत्तर दिलं, त्याचं कारण मराठीचं व्याकरण तुम्ही तयार केलं आहे. आम्ही ते केलं असतं तर तुमची भाषा अशुद्ध ठरली असती म्हणूनच, आज माझ्या ऑफिसात जी मंडळी बुलढाण्याचा उच्चार बुलढाणा असा करतात; तेव्हा मला आता त्यात आक्षेप घेण्यासारखं काही वाटत नाही. डॉ. वि. भ. कोलतेंचा 'लव्हाळी' हा काव्यसंग्रह आला होता. त्यातील हाड्या, शेव, आकू, चिडी, शिकोला, चाहाळ अशा व- बोलीतील शब्दांच्या वापराबद्दल सुशिक्षित कवी त्यांना हसत असत, असं त्यांनीच नमूद करून ठेवलंय. (किस्सा आणि संदर्भ डिसें.२०११च्या लोकराज्यमधील प्रा. विलास वाघ यांच्या लेखातून घेतला आहे.)

राज्य शासनानं नुकतीच सांस्कृतिक धोरण समिती बनविली होती. ज्येष्ठ विचारवंत डॉ. आ. ह. साळुंखे त्याचे अध्यक्ष होते. या समितीच्या अनेक शिफारशींपैकी एक होती-अन्य मराठी बोलींमधील शब्दांचा मराठी भाषेत स्वीकार. डॉ. साळुंखे यांनी असंही



अनुक्रमणिका

उदाहरणादाखल म्हटलंय की, ग्रामीण मराठीत जो जास्त, अती, फार या अर्थानं 'लई' शब्द वापरला जातो; तो प्रमाण भाषा मराठीत स्वीकारला जावा. याच जोडीला ज्येष्ठ साहित्यिक भालचंद्र नेमाडे यांच्या 'हिंदू' कादंबरीचं उदाहरण घ्या. या कादंबरीच्या भाषेचा मुख्य पोत प्रमाण मराठीचाच आहे. पण, त्यात मराठी संस्कृतीतील आमच्यासारख्या शहरी लोकांना माहीत नसलेले कित्येक मराठी शब्द आहेत की ज्यासाठी वेगळं परिशिष्टच नेमाडेंनी द्यायला हवं होतं की, काय असं वाटावं! मला हाच मुद्दा माझ्या आकलनाप्रमाणे पुढे नेऊन म्हणायचंय की, 'लई' शब्द स्वीकारूयात आणि 'लई' लिहिताना मात्र तो 'लयी' असा न लिहिण्याचं व्याकरणही मानूयात. आपल्याला परिचित अन्य भाषा किंवा बोलीतील शब्द स्वीकारण्यामागे असा विचार करायला हरकत काय? मग खुराफतपासून आलेला 'कुरापत' चालणाऱ्या आपल्या मराठीला 'कांटे की टक्करचं' मराठीकरण (वापरलं जाणारं) 'काट्याची टक्कर' बोचायचं कारण नाही.

इंग्रजी शब्दांचा वाढता वापर हाही वृत्तवाहिन्यांतील मराठीबाबतचा महत्त्वाचा आक्षेप आहे. हा मुद्दा स्पष्ट करण्यापूर्वी एक 'इंटरेस्टिंग' बाब सांगतो. सध्या मराठी वृत्तपत्रांत आकर्षक, रंगीत, फोटोंची रेलचेल असण्यामागे वृत्तवाहिन्यांचा मोठा प्रभाव आहे. पण, मराठी वृत्तवाहिन्यांची भाषा इंग्रजाळलेली करण्यात महाराष्ट्र टाईम्ससारख्या वृत्तपत्रानं सुरू केलेली भाषाशैली कारणीभूत ठरलीये. हे मी कौतुकानं सांगतोय. माझा हा दावा नाही, पणं निरीक्षण आहे की, या वृत्तपत्रानं मराठी भाषेला 'मिंग्लिश' स्वरूप देण्यात मोठी भूमिका बजावली. आज अगदी चाळीस वर्षांची परंपरा असलेल्या आणि मराठी भाषेची वृत्तपत्रातील स्कूल्स समजल्या जाणाऱ्या वृत्तपत्रांच्या मुख्य अंकात आणिं पुरवण्यांतही इंग्रजीचा मोठा वापर होण्यामागे हा प्रभाव- मोडणं कारणीभूत आहे. कारण आजची 'इ'–चाहूल याच वृत्तपत्राला पहिल्यांदा जाणवली. आज ही मराठी भाषा तुम्हाला आख्ख्या मोबाईल, सायवर विश्वात वापरली जात असल्याचं दिसेल. ही आजच्या पिढीची मराठी आहे. ही पिढी महत्त्वाकांक्षी आणि मेहनती व कमावतीही आहे. तेच या साऱ्या माध्यम व्यवहाराचे ग्राहक आहेत. मग वृत्तपत्रं काय किंवा वृत्तवाहिन्या काय, त्यांना स्पर्धेत टिकण्यासाठी याच मंडळींच्या भाषेत व्यक्त व्हायला नको का?

मी वेगळाच पर्याय मांडतोय. हिंदी सोडा! पण गेला बाजार इंग्रजीचं आक्रमण थोपवायचंय ना? मग मराठीचा शब्दपट विस्तारायला हवा. आकर्षक- या अर्थानं मुळात परस्परविरोधी अर्थ असणारे इंग्रजी 'हॉट' आणि 'कूल' शब्दांसाठी आपण काहीतरी 'झ्याक'सारखा शब्द घेणार आहोत का? हे वानगीदाखल आहे. याच्या उलट नवे मराठी शब्दही तयार केले जाताहेत, ज्यांचा वापर सर्वच माध्यमांत होतोय. उदा. 'वेबसाईट', 'मोबाईल'. मी वैयक्तिक पातळीवर या प्रतिशब्दांचा पुरस्कर्ता नाही. हे लक्षात घे की, तंत्रप्रधान असं हे इलेक्ट्रॉनिक माध्यम, ज्या तंत्रप्रवण भवतालात चाललंय, तिचा संकल्पक मूलस्रोत पाश्चात्त्य परिणामी इंग्रजी आहे. तेव्हा हा परिणाम बोलीपासून ते देहबोलीपर्यंतही दिसणारच. (तुम्हाला आठवेल की मी वृत्तवाहिन्यांतील पाहिली जाणारी मराठी असं का म्हणालो!)

सामाजिक आशयातून पाहाता, भाषेसाठी संकर गरजेचा आहे. भाषा सेंद्रीय- आहे. ती प्रभावकारी व प्रभावित होणारी आहे. माध्यमेही त्याला अपवाद नाहीत. अशा लेखाच्या शेवटी संत ज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठमधील मराठी भाषेबद्दलच्या कौतुकाच्या ओळी किंवा फादर स्टिफन्स यांच्या मराठी भाषेच्या प्रशस्तीमधली रुपकं उद्धृत करण्याचा मला मोह झाला खरा. पण, सध्याची मराठी अशा स्थितीत नाहीये. ती त्या कौतुकास पात्र करण्याची जबाबदारी माध्यमांची आहे... आपलीही!

❖❖❖



अनुक्रमणिका

# वृत्तपत्रे आणि मराठी भाषा

- नवनीत देशपांडे
(संपादक, दै. सकाळ, पुणे)

मराठी साहित्य परिषदेनं आयोजित केलेल्या या कै. का. र. मित्र व्याख्यानमालेतल्या माझ्या आजच्या व्याख्यानाचा विषय 'वृत्तपत्रांतील मराठी भाषा' असा आहे. तरीही त्याची व्याप्ती वाढवून, वृत्तपत्रांच्या बदलत्या भाषेच्या अधिक व्यापक चौकटीत मी या विषयाची मांडणी करणार आहे. ही चौकट स्पष्ट करण्यासाठी सुरुवातीला काही उदाहरणे मी आपणापुढे मांडतो.

काल रात्री टीव्ही पाहात होतो, गाणं चालू होतं, 'तुमने पुकारा और हम चलें आये...' गाण्यातलां प्रणयप्रसंग दाखवताना गुलाबाच्या फुलांचा प्रतीकात्मक वापर केला गेला होता... थोड्या वेळानं चॅनेल बदलून पाहिलं... एका चॅनेलवर चित्रपट चालू होता, 'लव्ह, सेक्स और धोका'...!

माझ्या लहानपणीची गोष्ट. मोठ्या भावाच्या दहावीच्या वर्षातही घरात रोज वर्तमानपत्र घेण्यासारखी परिस्थिती नव्हती. परंतु, गावात सुसज्ज ग्रंथालय होतं. तिथं सगळी वर्तमानपत्रं आणि नियतकालिकं येत. मला खेळण्याची आणि खेळांविषयी वाचण्याची विशेष आवड. माझा एक मित्रही अशाच घडामोडींसंदर्भातला वाचनवेडा. घरोघरी टीव्ही नसल्याचा तो काळ. त्यामुळं खेळ पाहाण्याची तहान आम्ही वाचनावर भागवायचो; आणि आम्ही तहानलेले जीव किती आणि काय पचवतो, यावर पैजा लावून आमची इतर मित्रमंडळी त्यातून रंजन करून घ्यायची.

वृत्तपत्रातले काही संदर्भ चाळत असताना १९८० मधली एका वृत्तपत्रातली जाहिरात नजरेला आली. डिस्काउंट सेलची. ५-१० टक्के किंवा काही विशिष्ट मालावर ५० टक्क्यांपर्यंत सूट देणार असल्याची ती जाहिरात... आता आजच्याच अंकातली जाहिरात पाहा. तीनावर पाच फ्री आणि वर २४९९ रुपयांचे रीबॉकचे घड्याळही!

काही समान सूत्र आढळतेय या सर्व उदाहरणांत? बारकाव्याने पाहिले, तर त्याचे उत्तर 'होय' असेच आहे. ते सूत्र आहे एकेकाळच्या मागणीच्या तुलनेत मर्यादित पुरवठ्याचे किंवा आताच्या काळातल्या मागणीपेक्षा कितीतरी अधिक पुरवठ्याचे.

कशामुळे होऊ शकतो हा बदल? मागणी घटल्याने, पुरवठा वाढल्याने, दोन्ही घटले तरीही त्यातही मागणी घटण्याचा वेग कमी राहिल्याने किंवा दोन्ही वाढले तरीही त्यात पुरवठ्याचा वेग मागणीलाही सहज मागे टाकू लागल्याने.

वरील तीनही उदाहरणांत चौथा पर्याय लागू झाल्याचे दिसते.

वर्तमानपत्रांच्या संदर्भात कसे करता येईल त्याचे विश्लेषण? वाचकांच्या रूचीतले बदल, वृत्तपत्रीय पर्यावरणातले बदल आणि तंत्रज्ञानाचा वृत्तपत्रांवरील किंवा समाजजीवनावरील (आणि उलटाही) परिणाम या अनुषंगाने या विषयाकडे आपण पाहू.

वृत्तपत्रांतले भाषेच्या संदर्भातले किंवा अन्य बदल शिक्षण, समाजजीवन किंवा समाजव्यवहार आणि संस्कृती यांच्या संदर्भाने तपासता येतील. वृत्तपत्रांचा प्रसार वेगवेगळ्या वर्गांत आणि mass paper च्या दिशेने होण्याला ऐंशीच्या दशकापासून सुरुवात झाली. खरे तर साक्षरतेच्या भिंती भेदून दूरचित्रवाणी ज्या ताकदीने घराघरांत पोहोचू शकते, त्या ताकदीने वृत्तपत्रे पोहोचण्याला अजूनही मर्यादा असल्याने त्यांना mass paper म्हणावे काय, हा अजूनही प्रश्नच



अनुक्रमणिका

आहे. परंतु, ऐंशीच्या दशकापर्यंत त्याचा प्रसार ज्या वर्गापुरता मर्यादित होता, त्या तुलनेत नंतरच्या काळात वाढलेला प्रसार पाहाता, मर्यादित अर्थाने तसे म्हणायला हरकत नाही. वृत्तपत्रांत काम करणाऱ्या वर्गातही याच काळात मोठे बदल दिसू लागले. त्यांच्या आणि तत्कालीन वाचकांच्या वाचनाच्या अपेक्षा, गरज आणि अभिरूचीत बदल आणि वैविध्यही मोठे आणि वाढते राहिले. तत्पूर्वीची वृत्तपत्रे प्राथमिक गरजांपलीकडचा विचार करू शकणाऱ्या मर्यादित अशा एका वर्गाचेच मत घडवू शकणारी किंवा समाजशिक्षकाची भूमिका पार पाडणारी होती. वाचकवर्ग बदलल्यानंतर किंवा खरे तर विस्तृत झाल्यावर या विषयांपलीकडे जाणे वृत्तपत्रांनाही भाग पडणे स्वाभाविक होते. त्यामुळे, तत्कालीन नवशिक्षित वाचकांना किंवा खरे तर नववाचकांना सामावून घेणारे विषय आणि त्या विषयांनुरूप भाषा वृत्तपत्रांतून डोकावू लागण्यास याच काळात सुरुवात झाली.

शिक्षण किंवा नोकरी-व्यवसायाच्या निमित्ताने होणारे स्थलांतर आणि त्याच्याच परिणामस्वरूप वाढणारे शहरीकरण यांचा वृत्तपत्रांमधील विषयांच्या निवडीपासून हाताळणीवर सत्तरच्या दशकापासूनच परिणाम दिसू लागला होता; तो नंतर आणखी ठळक होत गेला. शेतीवर अवलंबून असणाऱ्या घटकांपेक्षा नोकरी-व्यवसायावर अवलंबून असणाऱ्या वाचकघटकांचे वाढते प्रमाण आणि प्रभाव त्यातून जाणवू लागला. आपल्या देशाची कल्याणकारी व्यवस्था खुल्या अर्थव्यवस्थेच्या दिशेने जाऊ लागल्याचे प्रतिबिंबही उमटू लागले. त्याच्याही पुढे जाताना, विभक्त कुटुंबपद्धतीमुळे निर्माण झालेल्या गरजांतून वृत्तपत्र हे friend, philosopher, guide च्या भूमिकेत जाऊ लागले.

वाचकांच्या रूचीत यातून जे बदल घडत गेले, त्याची आणि एकूणच वृत्तपत्रीय पर्यावरणाची दखल वृत्तपत्रांच्या व्यवस्थापनांनी कशी घेतली, हेही पाहाणे *या संदर्भात* गरजेचे आहे.

आकलनाच्या दृष्टीने सोपे व्हावे म्हणून श्रमसंस्कृती, वाचनसंस्कृती, अर्थसंस्कृती, संचारसंस्कृती आणि तंत्रसंस्कृती अशा टप्प्यांत आपण वृत्तपत्रांचा वाचक असलेल्या सर्वसामान्यांचा प्रवास पाहू. (एक संस्कृती लोप पावली आणि दुसरीने ती जागा घेतली. एवढे सहजपणे अर्थातच त्याकडे पाहाता येणार नाही, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. परंतु, कोणत्या संस्कृतीतल्या वाचकघटकांची वृत्तपत्रांना दखल घ्यावी असे वाटत होते किंवा भाग पडत होते, त्यानुसार याकडे पाहाता येईल.) त्यातल्या पहिल्या दोन टप्प्यांत वृत्तपत्रे मतपत्रे तरी होती किंवा मतपत्रांपासून माहितीपत्रांच्या दिशेने त्यांचा प्रवास सुरू झाला होता. या काळातील वृत्तपत्रे प्रामुख्याने समाजशिक्षकाच्या भूमिकेत होती. मग आला 'पत्र नव्हे मित्र' म्हणवून घेण्याचा जमाना, आणि नंतर तर त्याही पलीकडे जाऊन वृत्तपत्रे होऊ लागली सल्लागार किंवा साथीदार. मात्र त्यातही बरीचशी वृत्तपत्रे a friend in need पेक्षा a friend of good times अशी काळानुरूप 'चलती' भूमिका घेत राहिली.

अधिक प्रसार, अधिक खप, अधिक वाचक आणि अधिक जाहिराती अशा चक्रात अडकणारे यशस्वी व्यावसायिक गणित त्यातूनच तयार होत गेले.

पत्रकार हा वृत्तपत्रांतील या सगळ्या बदलांचा catalist साक्षीदार आणि त्यांचे परिणाम भोगणाराही घटक. या पत्रकारांमध्येही सत्तरच्या दशकापर्यंत एक मर्यादित वर्गच होता आणि त्या वर्गावर उच्चभ्रू ठसा होता. वृत्तपत्रांच्या मालक आणि संपादकामध्ये हा वर्ग मोठा असल्यामुळे असेल; परंतु वृत्तपत्रांच्या निर्मितिप्रक्रियेत हा मोठा घटक एक विशिष्ट पर्यावरणापलीकडून त्यात प्रत्यक्ष सहभागी होत नव्हता. त्याला तशी संधीही फारशी नव्हती. त्यामुळे वृत्तपत्रांवर, त्यातल्या भाषेवर पुस्तकी छाप होती. नंतर वृत्तपत्र हेही नोकरीच्या संधी देणारे क्षेत्र होऊ लागले आणि



अनुक्रमणिका

मग ग्रामीण भागांतले किंवा अन्य वर्गांतले घटकही पत्रकारितेकडे अधिक प्रमाणात आकर्षित होऊ लागले. संपादकीय आशयाच्या निर्मितिप्रक्रियेतला घटक बदलू लागल्यावर स्वाभाविकपणे त्याची भाषाही त्याच्या कामातून डोकावू लागली. ऐंशीच्या दशकात वृत्तपत्रीय लेखनातला ग्रामीण स्पर्श जाणवू लागला. त्याही काळात पुण्याहून निघणारी वृत्तपत्रे प्रमाणभाषेनुसारच वाटचाल करीत राहिली, तरी राज्याच्या अन्य भागांतून निघणाऱ्या वृत्तपत्रांतून खानदेशी, वऱ्हाडी, वैदर्भीय अशा तिथल्या भाषांचे सौंदर्य डोकावू लागले. वेगवेगळ्या समाजांच्या संघर्षाच्या किंवा उत्कर्षाच्या काळात त्यांना प्रेरणादायी असे नेतृत्व देणाऱ्यांची भाषाही या वर्गाच्या व्यवहारात येऊ लागली. तशी ती वृत्तपत्रांतूनही दिसू लागली.

भौगोलिक प्रसाराच्या काळातले वृत्तपत्रांतले भाषेतले बदल या अर्थाने स्वाभाविक होते. परंतु, आजच्या वृत्तपत्रांतील भाषेवरचे समाजजीवनाचे किंवा अन्य परिणाम स्तंभित करणारे आहेत. काही वेळा तर आपली भाषा संगणकाच्या की बोर्डवरल्या अक्षरांसारखी निर्जीव आहे की काय, अशी शंकाही त्यातून येते. मुळातच वृत्तपत्रे ही घाईतली साहित्यनिर्मिती आहे, असे मानले जाते. परंतु, तोकडे शब्दसंग्रह असलेल्या आणि पुरवठ्यापेक्षाही मागणी जास्त अशा काळात, या क्षेत्रात उतरत असलेल्या पत्रकारांनी या घाईतल्या साहित्यनिर्मितीचाही दर्जा आज जिथवर आणून ठेवला आहे, ती स्थिती चिंता करावी, अशी नक्कीच आहे. वृत्तपत्रीय लेखनाकडे ताज्या घडामोडी आणि संदर्भापलीकडची साहित्यमूल्ये जोपासणारे माध्यम म्हणून पाहावे काय, हा वादविषय आहे. परंतु, प्रयोगशीलता आणि लवचिकता यांना प्रोत्साहन न देता 'की बोर्ड'पलीकडचा शब्दसंग्रह प्रत्यक्ष वृत्तपत्रांतून उमटण्याची शक्यता नजीकच्या काळात कमीच आहे.

सुमारे वीस वर्षांपूर्वी ब्रिटिश वृत्तपत्रांतल्या भाषेविषयीही अशीच चिंता व्यक्त होत असे. तिथल्या तीन प्रमुख दैनिकांच्या अग्रलेखांमधल्या भाषेचा तौलनिक अभ्यास करणारा एक संशोधनपर लेख नुकताच माझ्या वाचनात आला होता. त्याचे विश्लेषण करताना, आशयाच्या सादरीकरणात अनौपचारिकता ठेवणे आणि कमीत कमी जागेत अधिकाधिक आशय देणे या गरजांतून ती परिस्थिती उद्भवली असल्याचे त्यात म्हटले होते. बदलत्या आणि भिन्न रूचीच्या वाचकवर्गाला कवेत घेण्याच्या धडपडीतून ही परस्परविसंगत उद्दिष्टे वृत्तपत्रांची गरज बनत चालल्याचे त्यात नमूद करण्यात आले होते.

आज आपल्याकडील वृत्तपत्रेही नेमक्या अशाच वळणावर आहेत. वाचकवर्ग बदलतो आणि विस्तारतो आहे आणि या भिन्न रूचींच्या वाचकांना कवेत घेण्याचे आव्हान पेलण्याचे वेगवेगळे मार्ग अवलंबण्याचे वृत्तपत्रांचे प्रयत्न चालू आहेत.

अशा काळात वृत्तपत्रे आणि भाषा यांचे परस्परावलंबित्व कशामुळे धोक्यात येऊ शकते? आशय सादरीकरणात अनौपचारिकता ठेवणे; आणि कमीतकमी जागेत अधिकाधिक आशय देणे अशा गरजा वृत्तपत्रे कशा भागवू शकतील?

व्यावसायिक गणितामुळे वृत्तपत्रे जाहिरातींना प्रतिसाद देणाऱ्या वाचकांशीच फक्त जेव्हा बोलू लागतात, तेव्हा आपले शब्दसंग्रह थिटे पडण्याचा धोका निर्माण होतो. सुदैवाने, नवशिक्षित किंवा एकूणातच नववाचक वर्ग समोर येण्याची आणि वृत्तपत्रांकडे वळण्याची प्रक्रिया अद्याप आपल्या देशात सुरू आहे. महाराष्ट्रासारख्या प्रगत राज्यातल्या पुण्यासारख्या पुढारलेल्या जिल्ह्यात देखील अद्याप २५% घरांतही पोहोचणे वृत्तपत्रांना साध्य झालेले नाही. त्यामुळे वाचकांशी संवादाचे प्रस्थापित नसलेले मार्ग वृत्तपत्रांनाही शोधावे लागणार आहेत. त्यातून भाषेचे प्रयोग किंवा लवचिकता दाखवणारी वृत्तपत्रे अधिक प्रभावी ठरण्याची आणि तरण्याची शक्यता अधिक आहे.

छापील स्वरूपातील वृत्तपत्रे ही बदलत्या काळातील

वाचकाची गरज राहील काय, असाही एक प्रश्न वारंवार चर्चिला जातो. यदाकदाचित तशी गरज उरलीच नाही, तरीही ताज्या घडामोडींचा प्रसार करणाऱ्या माध्यमांची गरज काही संपणार नाही... आणि तीही गरज मर्यादित झाली, तरी संवादाची गरज मात्र कायम राहाणार आहे, जोवर माणूस विचार करतो आहे, तोवर त्या विचाराचा भाषेच्या स्वरूपातील आविष्कार कायम राहाणार आहे... आणि तो आविष्कार मराठीतून असणारच नाही, असे का म्हणायचे?

◇◇◇

## वार्षिक ग्रंथपारितोषिके (२६ मे २०१२)

| | | |
|---|---|---|
| अभिजात पारितोषिक (सामाजिक शास्त्रे) | प्रा. डॉ. मच्छिंद्र मालुंजकर | 'अभंगपौर्णिमा' |
| शंकर पाटील पारितोषिक (कथासंग्रह) | डॉ. रमा मराठे | 'ती दोघं' |
| दि. बा. मोकाशी पारितोषिक (कादंबरी) | आनंद विंगकर | 'अवकाळी पावसाच्या दरम्यानची गोष्ट' |
| ग.ह. पाटील पारितोषिक (शिक्षणविषयक) | डॉ. अरुण निगवेकर | 'उच्चशिक्षण-समस्या आणि प्रवाह' |
| नी. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) | अनुबंध प्रकाशन | 'ब्रीद तुझे जगी दीनानाथ' |
| कीर्तनसंजीवनी पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक (आत्मचरित्र) | शि. द. फडणीस | रेषाटन-आठवणींचा प्रवास |
| शिवाजी सावंत पुरस्कृत राधाबाई सावंत स्मरणार्थ 'मृत्युंजय' पारितोषिक | डॉ. मिलिंद पराडकर | 'प्राचीन भारतीय दुर्गशास्त्र आणि हिंदवी स्वराज्याच्या दोन राजधान्या-राजगड व रायगड- एक तुलनात्मक अभ्यास' |
| कमल व के. पी. भागवत पारितोषिक (वैचारिक-मानसशास्त्र, समाजशास्त्र स्त्रीजीवनविषयक) | वंदना अत्रे<br>भारती ठाकूर | 'पाऊल पुढे पडताना' |
| स. रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ पारितोषिक (उत्कृष्ट वाङ्मयमूल्य | वैशाली करमरकर | 'संस्कृतिरंग' |
| डॉ. अरविंद वामन कुलकर्णी पारितोषिक (उत्कृष्ट कवितासंग्रह) | ऐश्वर्य पाटेकर | 'भुईशास्त्र' |
| वि. वि. बोकील पारितोषिक (उत्कृष्ट बालवाङ्मय) | राजीव तांबे<br>मोहन काळे | 'गंमत शाळा' (गद्य)<br>'दोन होते बोके' (पद्य) |
| अंबादास माडगूळकर पारितोषिक (सामाजिक आशय) | मनोहर सोनवणे | 'सदरा बदललेली माणसं' |



अनुक्रमणिका

# भारतीय भाषांचे भवितव्य

– डॉ. नीलिमा गुंडी

*[जागतिकरणाच्या नव्या संज्ञापनतंत्रामुळे काही भारतीय भाषांच्या अस्तित्वाला धोका निर्माण झाला आहे. भारतासारख्या बहुभाषिक देशात भाषानियोजनाने हा धोका कमी करता येईल. त्यासाठी लेखिकेने काही उपायही सुचविले आहेत, 'सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस', म्हैसूर, ऑरेगॉनमधील 'लिव्हिंग टंग्ज इन्स्टिट्यूट', डॉ. गणेश देवी यांनी 'भाषासंगम' ह्या नावाने आयोजित केलेले संमेलन इ. कार्याची ओळख करून घेणे. भाषा व्यवस्थापनासाठी राष्ट्रीय भाषा आयोग स्थापण्याची डॉ. गुंडी यांची सूचना राज्यकर्त्यांनी उचलून धरली पाहिजे. –संपादक]*

अलीकडच्या काळात, अनेक भाषांच्या भवितव्याविषयी सातत्याने चिंता व्यक्त केली जात आहे. जगभरच हे चित्र दिसत आहे. याला काही सार्वत्रिक स्वरूपाची कारणे आहेत. मुख्य कारण म्हणजे १९९१ मध्ये वर्ल्ड वाईड वेबचा शोध लागला आणि तंत्रज्ञानयुगाने नवे संज्ञापनमाध्यम जन्माला घातले. इंग्रजी ही भाषा जागतिक संपर्कभाषा म्हणून मान्यता पावू लागली. अर्थातच, जगातल्या अनेक भाषा मृत्युपंथाला लागल्या. काही भाषांचे सपाटीकरण होण्याची प्रक्रिया सुरू झाली. जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे जगभर स्थलांतरंही मोठ्या प्रमाणावर होऊ लागली. त्यामुळे आपापल्या समूहाची, प्रदेशाची भाषा टिकवणे लोकांना कठीण जाऊ लागले.

या पार्श्वभूमीवर एक भाषाप्रेमी म्हणून विचार करताना भारतीय भाषांचे भवितव्य 'आपण' घडवायचे आहे; याची मला सर्वप्रथम जाणीव करून द्यावीशी वाटते. भारतीय भाषांच्या भवितव्याचा प्रश्न खूपच गुंतागुंतीचा आहे. भारतात घटनेने मान्यता दिलेल्या २४ प्रादेशिक भाषा आहेत. त्याशिवायही असंख्य भाषा आहेत, आदिवासी समूहांच्या व इतरांच्याही अनेक बोली आहेत. एकट्या महाराष्ट्रातच ५८ बोली बोलल्या जातात. भारतामध्ये ज्या भाषा सुमारे १० लाख लोक बोलतात, अशा किमान ८० भाषा आहेत. त्या सर्व जनगणनेत नोंदल्याही जात नाहीत. वास्तविक त्या भाषाही आपापल्या समूहाच्या संपर्क भाषा असून, त्यात पारंपरिक मौखिक धनही आहे.

ग्रिअर्सन यांच्यानंतर म्हणजे शंभरएक वर्षांत आपल्याकडे 'लिंग्विस्टिक सर्व्हे' कोणी केलेलाच नाही! त्यामुळे आपले भाषाविषयक परिस्थितीचे नेमके चित्रच उभे राहात नाही. एखाद्या राजाच्या तिजोरीत असंख्य रत्ने असावीत, पण ती त्याने मोजलेलीच नसावीत; तशी आपली स्थिती आहे!

अंदमान बेटावरल्या आदिवासी समूहांच्या अनेक भाषा लोप पावत आहेत. २०१० मध्ये तियली 'बो' भाषा बोलणारी शेवटची स्त्री गेली; आणि तिच्याबरोबरच त्या भाषेबरोबरची हजारो वर्षांची सांस्कृतिक परंपराही लुप्त झाली, असे सतत घडत आहे.

भाषाविषयक धोरण : आपल्याकडे १९५५ मध्ये राजभाषा आयोग नेमला. त्यानंतर त्याच्या अहवालावर विचार होऊन १९६० मध्ये राजभाषाविषयक धोरण अस्तित्वात आले. भाषावार प्रांतरचना करताना सर्व प्रांतिक भाषांना काही अधिकार मिळाले. राजभाषेचा दर्जा मिळाला. प्रत्यक्षात राजभाषेचा दर्जा असूनही समाज आणि शासन पातळीवरील व्यवहारात आपल्या प्रादेशिक भाषांना त्यांचे न्याय्य स्थान मिळालेले नाही; ही वस्तुस्थिती आहे. लोकशाहीमध्ये सर्वसामान्यांची भाषा ही ज्ञानव्यवहाराची भाषा व्हायला हवी. कारण ज्ञान ही देखील एकप्रकारची सत्ता असते. असे असूनही आमची अनेक ज्ञानक्षेत्रे सामान्यांपासून कोसो दूर राहातात. याची कारणे



अनुक्रमणिका

अनेक आहेत.

मुळातच आमच्याकडे आपल्या भाषांचा विकास व्हावा, अशी पुरेशी इच्छाशक्तीच नाही. आम्हाला संवाद आणि अस्मिता एवढ्यापुरताच भाषेचा कळवळा असतो. आम्ही भावनिक अंगाने भाषेच्या प्रश्नाकडे पाहातो. वास्तविक भाषेचा प्रश्न ज्ञानव्यवहार आणि त्याच्याशी निगडित सत्ता, तसेच भौतिक सुखे यांच्याशी निगडित आहे. आपल्या भाषा त्या अंगाने समर्थ असल्याची खात्री पटायला हवी. ती न पटल्यामुळे शालेय शिक्षण प्राथमिक स्तरावर मातृभाषेत द्यावे, या शैक्षणिक तत्त्वाकडे आपला समाज पाठ फिरवत आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळांची संख्या केवळ महानगरात आणि शहरातच नव्हे, तर ग्रामीण भागातही वाढत आहे. इतकंच नव्हे, तर शालेय स्तरावर इंग्रजीबरोबरच आणखी एक परकीय भाषा शिकायला आमच्याकडे परवानगी आहे. आणखी एक भाषाच शिकायची तर ती आपल्या नजीकच्या राज्याची शिकवावी! तशी संधी शालेय स्तरावर उपलब्ध करून द्यावी! पण शासन काय आणि समाज काय! आपण यातून नेमके काय गमावत आहोत, याचाच कुणाला पत्ता लागलेला नाही.

आमच्या भाषा पुरेशा आधुनिक नसल्याची तक्रार करण्यात येते. पण त्यांचा त्याप्रकारे विकास घडवायची जबाबदारी आमचीच आहे. त्यांच्यात आधुनिक काळातील विज्ञान-तंत्रज्ञानादी जीवनक्षेत्रांचा समावेश होण्यासाठी परिभाषा घडवली पाहिजे, ती रुजवली पाहिजे. त्यासाठी सुरुवातीला परभाषेतील शब्द वापरायलाही हरकत नाही. (इतर भाषांतील शब्द घेऊनच इंग्रजी भाषा श्रीमंत झाली आहे). एकीकडे आपण नवी परिभाषा घडवणं आणि रुळवणं सुरूच ठेवायला हवं.

शिक्षणतज्ज्ञ वा. ब. पटवर्धनांनी म्हटलं आहे की, आपल्या भाषा या आपल्या पूर्वजांच्या आत्म्याचे निःश्वास आहेत. आपल्याकडे अनेक भाषा असणं, ही आपली अडचण नाही, तर ती आपली समृद्धी आहे. पर्यावरणाच्या आरोग्यासाठी जशी जैवविविधता आवश्यक असते, तशी आपल्या बहुसांस्कृतिक देशात समाजाचे सांस्कृतिक आरोग्य टिकविण्यासाठी भाषावैविध्यही जपायला हवं. त्यासाठी आर्थिक आणि कृतिशील पाठबळ उभं करायला हवं.

**भाषाविषयक दृष्टिकोन :**

आमच्या भाषांना खरं तर हजारो वर्षांची समृद्ध वाङ्मयीन परंपरा आहे. हा मोठाच सांस्कृतिक वारसा आहे. पण आपला भाषाविषयक दृष्टिकोन भाषांच्या विकासाला पूरक नाही. पारतंत्र्यकाळात देशी भाषांसाठी व्हर्नाक्युलर्स' हा शब्द तुच्छतेने वापरला जायचा. आजही आमच्या मनात, आमच्या भाषांविषयी तुच्छताबुद्धी किंवा न्यूनगंड असा भावच मोठ्या प्रमाणावर आहे. पुरेसा आदर आणि विश्वास नाही. जेव्हा डॉ. अशोक केळकर, डॉ. गणेश देवी असे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भाषातज्ज्ञ आमच्या भाषांचे महत्त्व सांगू लागले, तेव्हा आम्हाला थोडी जाग येऊ लागली. डॉ. मॅक्सीन बर्नसन, ज्या फलटणला मराठी माध्यमाची शाळा चालवतात, त्यांनी एक उदाहरण दिलं आहे, ते असं आहे : 'दिल्लीजवळच्या एका 'ग्लोबल स्कूल'ची जाहिरात आहे. त्यात प्रादेशिक भाषा बोलणारी कामवाली आणि तिच्याशी चेंडू खेळणारी गोरी, गुबगुबीत अशी उच्च मध्यमवर्गीय घरातली मुलगी दाखवली आहे. आई-वडील दिवसभर बाहेर असताना तुमची मुलगी कामवालीची भाषा शिकणार, असा धोक्याचा संदेश त्यातून दिला आहे. हेतू हा की, तुम्ही मुलांना अशा शाळांमध्ये घालावं!'

अशा शाळांमधून प्रादेशिक भाषा बोलणाऱ्यांकडे तुच्छतेने पाहाण्याचे शिक्षण मिळण्याचाच खरा धोका आहे. अशाने उद्याच्या श्रीकृष्णाला, उद्याच्या सुदाम्याची व्यथा कशी कळणार?



अनुक्रमणिका

**भारतीय भाषांचे जागतिकदृष्ट्या महत्त्व :**

आपल्याला जरी आपल्या भाषांचे महत्त्व पुरेसे कळले नसले, तरी ते जगातील तज्ज्ञांना कळले आहे. आपल्या काही भाषा खूप प्राचीन आणि वैभवसंपन्न आहेत. जागतिक पातळीवरील अभ्यासकांना त्याची जाणीव आहे. तौलनिक अभ्यासक्षेत्रामध्ये जागतिक स्तरावर भारतीय भाषांना स्थान आहे.

जागतिक नकाशावर भाषावैविध्याचे केंद्र म्हणून अरुणाचलला स्थान आहे. तेथे सुमारे ५० भाषा बोलल्या जातात. त्यापैकी काही प्राचीन व दुर्मीळही आहेत. त्यामुळेच काही वर्षांपूर्वी ऑरेगॉनमधील 'लिव्हिंग टंग्ज इन्स्टिट्यूट' या संस्थेने तेथे संशोधन प्रकल्प राबवला होता.

स्वातंत्र्यानंतर पहिल्यांदा तमीळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळाला. त्यामुळे तिच्यात जागतिक पातळीवर संशोधन प्रकल्प राबवले जाऊ शकतात. सांगायची गोष्ट अशी की, तमीळला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा, ही मागणी अमेरिकेतील कॅलिफोर्निया विद्यापीठातील तमीळ भाषेचे तज्ज्ञ प्रा. जॉर्ज हार्ट यांनी पहिल्यांदा केली होती!

आमच्या भाषारूपी राष्ट्रीय संपत्तीचे महत्त्व आम्हाला पुरेसे कळेल, तेव्हा त्या संपत्तीचे आम्हाला नीट नियोजन करता येईल. आजही नियोजन व विकास यासाठी काही उपाययोजना सुचवता येतील.

**विकासासाठी उपाययोजना :**

भाषांच्या विकासासाठी आपण माध्यमांचा सुयोग्य रीतीने वापर करून घ्यायला पाहिजे. नभोवाणी हे माध्यम छोट्या भाषांच्या जतन-संवर्धनासाठी उपयुक्त आहे. ते अधिक कार्यक्षमतेने वापरले पाहिजे. इंटरनेट' या माध्यमावर स्वार व्हायला पाहिजे. या माध्यमामुळे जगभरात स्थायिक झालेल्या भाषकांचा परस्परसंपर्क प्रस्थापित होऊ शकतो. त्याद्वारे भाषिक व्यवहाराला चालना मिळते. त्याचा उपयोग करून घेतला पाहिजे.

'भाषानियोजन' केले पाहिजे. भाषानियोजन म्हणजे भाषिक प्रश्नांची जाणीवपूर्वक योजनाबद्ध रीतीने सोडवणूक करणे. ही सामाजिक आणि भाषावैज्ञानिक अशी संकल्पना आहे. भाषेचे प्रमाणीकरण करणे, लिपीत सुधारणा करणे, भाषेत शब्दकोश, उच्चारकोश, व्याकरणग्रंथ इत्यादी साधनसामग्री निर्माण करणे इत्यादी प्रकारे नियोजित उद्दिष्टे साध्य करता येतात.

आंतरराष्ट्रीय पातळीवरील भाषातज्ज्ञ, शासन व सामाजिक संस्था यांच्या सहकार्यातून राष्ट्रीय भाषा आयोग स्थापण्याची गरज आहे.

आपल्याकडे 'सी.आय.आय.एल.' (सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस) ही म्हैसूर येथील संस्था छोट्या भाषांसाठी मदत करते. त्या भाषांचे दस्तऐवजीकरण करणे, त्यांत सचित्र शब्दसंग्रह काढणे, लघुनियतकालिके काढणे यांसाठी आर्थिक साहाय्य देऊ करते. अशा केंद्राची पुरेशी माहितीच आम्हाला नसते.

आपण बहुभाषिक होण्याचीही गरज आहे. इंग्रजीचा द्वेष नको, इतर कोणत्याच भाषांचा द्वेष नको. 'जगा आणि जगू द्या,' हे आमचे तत्त्वज्ञान आहे. परस्परांच्या विरुद्ध उभे राहून आम्ही आमचीच शक्ती क्षीण करीत आहोत. आपण बदलत्या परिस्थितीला सामोरे जाताना आपली भाषा परभाषकांना शिकवण्याचे व्यावहारिकदृष्ट्या उपयुक्त उपक्रम हाती घ्यायला हवेत. नव्या क्षेत्रांना अनुलक्षून, तसेच नव्या गरजांनुसार व्यावहारिक स्तरावरचे भाषालक्ष्यी अभ्यासक्रम तयार करायला हवेत. अनुवाद प्रकल्पाद्वारे परस्परांशी संपर्क वाढवायला हवा.

डार्विनच्या उत्क्रांतिवादानुसार प्राणिमात्रांना अस्तित्व टिकवण्यासाठी ज्या अटी आवश्यक असतात, त्या भाषांनाही लागू पडतात. एक म्हणजे शक्ती हवी. भाषेची शक्ती म्हणजे तिच्यातील शब्दसंग्रह. त्यासाठी कोशांची निर्मिती केली पाहिजे. गरज पडल्यास परकीय शब्दांना आपले व्याकरणाचे नियम लावून आपल्या भाषेत समाविष्ट करून घेतले पाहिजे. उदा. 'टेबल' या इंग्रजी शब्दाचे आपण 'टेबलावर' असे मराठी व्याकरणाच्या नियमानुसार सामान्यरूप करतो. त्यामुळे

तो शब्द आपल्याला खटकत नाही.

दुसरी आणि महत्त्वाची अट आहे लवचिकता अंगी बाणवणे. 'अनुकूलन' म्हणजे परिस्थितीतील बदलानुसार बदलणे, ही उत्क्रांतितत्त्वातील मुख्य अट आहे. त्यामुळे काळानुरूप काही बदल स्वीकारले पाहिजेत. संक्षेप ही आधुनिक काळाची गरज मराठीतून साध्य होत नाही. त्यामुळे आपल्याला इंग्रजीतील संक्षेपरूपे वापरावी लागतात. त्याला इलाज नाही. आपण अॅ, ऑ हे इंग्रजी स्वर नाही का स्वीकारले? तेव्हा टिकून राहाणे सर्वांत महत्त्वाचे आहे. संक्रमणकाळात थोडे धक्के सोसावे लागतील. आमच्या 'मराठी अभ्यास परिषदे'चे घोषवाक्य आहे, 'मराठीचे डोळे, इंग्रजीची खिडकी.' तेव्हा जगाकडे पाहायला खिडक्या अनेक असू द्या. आमची दृष्टी टिकून राहाणे महत्त्वाचे आहे.

तिसरी अट म्हणजे प्रतिकारशक्ती. आपली सहिष्णुता म्हणजे दुबळेपणा नव्हे. आपल्या भाषेच्या न्याय्य हक्कासाठी आपण जागरूक असायलाच हवे.

येथे मला एक उदाहरण द्यावेसे वाटते. डॉ. गणेश देवी यांनी काही दिवसांपूर्वी 'भाषासंगम' नावाचे एक संमेलन भरवले होते. त्यात ३२० भारतीय भाषांचे प्रतिनिधी उपस्थित होते. त्यात प्रत्येकाला दुसऱ्या भारतीय भाषेचा फलक हातात उंच धरून जायला सांगितले होते! दुसऱ्या एका भारतीय भाषेची जबाबदारी आपल्या खांद्यावर आहे, हा त्याचा संदेश होता. ही वृत्ती हवी! एका भाषेच्या न्याय्य हक्कासाठी तिच्याबरोबरच इतर भाषक समाजानेही पुढे आले पाहिजे. कारण आज एक जात्यात असेल, तर उद्या दुसरी सुपात आहे! तेव्हा परस्परसहकार्यातूनच आपल्या भाषांचे भवितव्य टिकून राहाणार आहे. एकंदरीत, प्रत्येक भारतीय व्यक्तीने 'आपली भाषा ही आपली चौथी मूलभूत गरज आहे,' अशा विचारातून वागायला सुरुवात केली पाहिजे. त्यातच आपल्या साऱ्यांचे हित दडलेले आहे.

◇◇◇

**डॉ. नीलिमा गुंडी**
३, अन्नपूर्णा १२५९, शुक्रवार पेठ,
सुभाषनगर, पुणे ४११००२
फोन २४४८६०१५
संपर्क : nmgundi@gmail.com

## वार्षिक ग्रंथपारितोषिके (२६ मे २०१२)

| | | |
|---|---|---|
| शरश्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (लक्षवेधी साहित्य ग्रंथ) | मुक्ता मनोहर | 'नग्नसत्य' |
| शरश्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (प्रबंधलेखन) | डॉ. जया जगताप | 'दलित कवयित्रींची कविता : एक अभ्यास' |
| माधव मदाने पुरस्कृत शरश्चंद्र चिरमुले पारितोषिक (कथासंग्रह) | मृणालिनी चितळे | 'सिनार' |
| डॉ. पुष्पा शिरोळे पारितोषिक (आहार, आरोग्य) | डॉ. वर्षा जोशी<br>डॉ. हेमा क्षीरसागर | '१२ व्या शतकातील खाद्यसंस्कृती' |
| मालिनी शिरोळे पारितोषिक (स्तंभलेखन) | सुरेशचंद्र पाध्ये | 'मनगूज' |
| अॅड. त्रिंबकराव शिरोळे पारितोषिक (ललितगद्य) | डॉ. सलील कुलकर्णी | 'लपवलेल्या काचा' |

## अंतर्वेध

– प्रा. द. ता. भोसले

श्री. यशवंतराव गडाख यांच्या 'अर्धविराम' आणि 'सहवास' या दोन ग्रंथातून सशक्त प्रतिभा असलेला एक लेखक आपणाला पुन्हा पुन्हा भेटतो. ही दोन पुस्तके म्हणजे त्यांच्या सर्जनशीलतेची दोन बाळसेदार अपत्येच होत. पण या दोन पुस्तकांवर चैतन्याने रसरसलेल्या छोट्याशा बीजाचा झालेला बहुशाखीय वृक्षविस्तार येथे जाणवतो आहे. नियतीने तळहातावर केवळ शून्य काढलेले असले तरी त्या शून्याला किंमत येण्यासाठी, अंकलिपी कोरणाऱ्या स्वप्नवेड्या भूमिपुत्राचे येथे दर्शन घडते. महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, औद्योगिक आणि सांस्कृतिक इतिहासाचे मनोज्ञ दर्शन या दोन ग्रंथांतून घडते आहे. नगर जिल्ह्यातील आणि व्यापक अर्थाने प. महाराष्ट्रातील सर्व पक्षांतील मान्यवर नेते आणि त्यांचे कार्य, त्यांचा स्वभाव यांची एक 'आर्ट गॅलरी'च श्री. यशवंतराव गडाखांनी येथे उभी केली आहे. 'अर्धविराम' आणि 'सहवास' या दोन ग्रंथांच्या पार्श्वभूमीवर, श्री. गडाख यांच्या 'अंतर्वेध' या तिसऱ्या ग्रंथाच्या अंतरंगात आपण प्रवेश करणार आहोत.

मातीत हात कालवण्यापासून, हातावर कोवळा हुरडा चोळून खाण्यापर्यंतचे विविध अनुभव त्यांनी आपल्या ललितलेखनात नोंदविले आहेत. त्यामुळे हा लेखक साचेबंद व्यक्तिमत्त्वाचा वाटत नाही. मुळातच शेती-मातीशी जन्मत: नाळ असलेला हा लेखक आहे. आणि शेती आणि निसर्ग यांच्याशी नाते असलेल्या लेखकाचे व्यक्तिमत्त्व कधीच एकांगी होत नाही. एकांगी होत नसते.



आई, ताई, भाऊ, पत्नी यांनी आपल्यासाठी खूप खूप सोसलेले असते. झेललेले असते आणि खूप काही पचवलेलेही असते. पण निवडणुकीच्या काळात अनेक गावातील अनेक हितचिंतकांनी स्वत:च पैसा गोळा करून गडाखांच्या निवडणुकीमध्ये आनंदाने खर्च तर केलाच, शिवाय एकजुटीने विजयाची माळही त्यांच्या गळ्यात घातली. मतदारांनी प्रेम द्यावे, मत द्यावे, वेळ द्यावा, पैसा द्यावा आणि गडाखांनी तितक्याच निष्ठेने कृतज्ञतेतून परतफेड करावी, असा हा सारा माहोल त्यांच्या लेखनातून कळतो. ही कृतज्ञताच त्यांना मोठे करते नि त्यांच्या व्यक्तित्वालाही मोठेपणा बहार करते. राजकारणाच्या गढूळ नि विषारी वातावरणात हे मोठेपण अधिक उठावदार दिसते.

श्री. गडाख हे स्वत: भूमिपुत्र असल्याने शेतकऱ्याने सामाजिक स्थान आणि महत्त्व पुरेपूर जाणून आहेत. श्री. गडाखांच्या मते शेतकरी हा 'धंदा' म्हणून शेती करीत नसतो. तो त्याचा 'जीवनधर्म' असतो. ती त्याची उपासना असते. आर. जे. इंगरसोल नावाच्या विचारवंताने असे म्हणून ठेवलेले आहे की, "शेत नांगरणे हा ईश्वराच्या प्रार्थनेचाच एक भाग आहे." हातात लेखणी घेतलेला कलावंत, हाती पूजेचे तबक घेतलेला पूजारी, हातात वाद्य घेतलेला संगीतकार आणि हातात नांगर धरणारा शेतकरी हे एकाच उंचीचे कर्तृत्व असणारे कलावंत आहेत. दुसऱ्या शब्दांत असे म्हणता येईल की, शब्दब्रह्म, नादब्रह्म निर्माण करणाऱ्या कलावंतापेक्षा अन्नब्रह्म निर्माण करणारा शेतकरी जराही कमी प्रतीचा



अनुक्रमणिका

नाही. किंबहुना, अन्नब्रह्माशिवाय अन्य कला निर्माणच होऊ शकणार नाहीत. म्हणून तो केवळ भूमिपुत्र नाही. तो खऱ्या अर्थाने 'अमृत पुत्र' आहे. जगाला अमृताचा प्रसाद वाटणारा साधक आहे. तो केवळ नागर समाजाचा अडाणी सेवक नाही. तो देशाचा नायक आहे.

या साऱ्या गोष्टींची सच्ची जाणीव श्री. गडाखांच्या या तिसऱ्या ग्रंथात म्हणजे 'अंतर्वेध'मध्ये अतिशय उत्तमप्रकारे व्यक्त झाली आहे. म्हणूनच वाडी-वस्तीवर वाढलेला, पिकाफुलांतू धावलेला, मातीबरोबर खेळणारा, अंगणात बसून गावकऱ्यांशी हितगूज करणारा, शेतमजुरांच्या रांजणातील पाणी पिणारा आणि ग्रामसंस्कृतीच्या शैशव वयातील कोवळ्या आठवणीत रमणारा, खेडूत नातेवाइकांविषयी आस्था असणारा हा भूमिपुत्र; शेतकऱ्यांचा खराखुरा प्रतिनिधी वाटतो आणि शेतकऱ्यांनाही तो 'आपला माणूस' वाटतो. या गोष्टींमुळे आणि त्यातून साकारलेल्या आत्मीय भावनेमुळे चिंब झालेले श्री. गडाखांचे व्यक्तिमत्त्व त्यांच्या या तिसऱ्या पुस्तकातून अधिक उजळ होते.

पहिल्या दोन पुस्तकांपेक्षा 'अंतर्वेध' हे पुस्तक मला काही बाबतीत वेगळं वाटतं. पहिल्या दोन पुस्तकांत राजकारणी व्यक्तींची मांदियाळी पाहावयास मिळते. 'अंतर्वेध'मध्ये एकही राजकारणी माणूस चित्रित झाला नाही. 'अर्धविराम'मध्ये जीवनाला लाभलेली दिशा, लाभलेली गती आणि त्यातून झालेला कार्याचा विस्तार पाहावयास मिळतो. तर 'सहवास'मध्ये या कर्तृत्वामध्ये ज्यांनी निरपेक्ष भावनेने रंग भरले; त्यांचा वाचकांवर खोल परिणाम घडला आहे. पहिल्या दोन पुस्तकांत आधार देणारी सहप्रवास करणारी आणि पाठीशी खंबीरपणे निष्ठेने उभी राहणारी अशी तीन प्रकारची माणसे आपल्यासमोर येतात; तर या पुस्तकात प्रेम, वात्सल्य, सेवा आणि मैत्र यांची ऊब देणारी माणसे अधिक आढळतात. पहिल्या दोन पुस्तकांतून ग्रामजीवन, ग्रामीण संस्कृती आणि ग्रामीण माणूस यांचे अर्धशतकापूर्वीचे जीवन साकार झालेले आहे; तर 'अंतर्वेध'मध्ये यात झालेली भलीबुरी स्थित्यंतरे आणि वेदना देणारे दर्शन घडते. म्हणून 'अंतर्वेध' हे तीन पातळ्यांवरील प्रवास नोंदविणारे पुस्तक आहे असे मला वाटते. वैयक्तिक जीवनप्रवास, कौटुंबिक जीवन प्रवास आणि ग्रामीण समाज आणि संस्कृतीचा प्रवास या त्या तीन पातळ्या होत. त्यातही ग्रामीण समाज आणि संस्कृतीचा अंतर्मुख करणारा चिंतनशील प्रवास; हे या पुस्तकाचे मला खास वैशिष्ट्य वाटते.

श्री. गडाखांच्या मते खेड्यातील माणसे शिक्षणाने कमी असतील; पण शहाणपणात थोर असतात. निरपेक्ष प्रेम, निरपेक्ष सेवा, निरपेक्ष काम, निरपेक्ष समर्पण, निरपेक्ष मैत्री आणि निरपेक्ष आयुष्य याची ती जिवंत आणि अपवादात्मक उदाहरणे असतात. ही माणसं वरून ओबडधोबड असली तरी काळजाने स्वच्छ असतात. जगणे कसे जगावे, कुणासाठी जगावे, याचे कसलेही पाठ न गिरविता ते आदर्श जीवन जगत असतात. आपले जगणे हे पायवाट तेजाळून टाकणाऱ्या नक्षत्रासारखे असावे, हा विचार त्यांच्या मनात नांदत असतो. माणूसपण, मूल्यप्रेम, सहजभाव यांत ती मोठी असतात. या पुस्तकातील एकनाथ काय किंवा मच्छिंद्र पाटील काय : ही माणसे अशी मातीला पवित्र करण्यासाठी देवदूतासारखी खाली अवतरतात. श्री. गडाखांच्या ताईसाहेब याही त्यातल्याच एक. शुभम् रूप असलेल्या एक देवदूतच आहेत. पारुबाई एक विलक्षण व्यक्तिचित्र आहे.

व्यक्तिचित्रे रेखण्यात श्री. यशवंतराव गडाखांचा विशेष हातखंडा आहे. 'सहवास'मधील त्यांची

व्यक्तिचित्रणे तर 'अप्रतिम' याच शब्दाने वर्णन करावी लागतील. यातील व्यक्तिचित्रणेही अगदी अशीच आहेत. ती वाचकांना आदरणीय आणि खरीखरी वाटतात. मराठीत व्यक्तिचित्रणाची परंपरा मोठी आहे. पण अनेकदा ज्यांची ती चित्र आहेत; त्यांच्यापेक्षा लेखकच अधिक प्रकट झालेला असतो. त्या व्यक्तीशी आपले संबंध कसे जवळिकीचे आहेत यावर भर देत देत, मीदेखील त्यांच्या इतकाच किंवा अधिकच मोठा आहे, अशी आत्मश्लाघा करणारी व्यक्तिचित्रे मराठीत कमी नाहीत. स्वत:च्याच चेहऱ्याभोवती स्वत:च आरती ओवाळण्याचा प्रकार श्री. गडाखांच्या बाबतीत जराही दिसून येत नाही. त्यामुळे त्यांची सारीच व्यक्तिचित्रणे शब्दांच्या पलीकडेच असे काहीतरी भरभरून देत असतात. त्यामुळे वाचकही उन्नत मनाचा आणि मूल्यप्रेमी बनत असावा, असे मला मनोमन वाटते.

एक मूल्यप्रेमी, सुसंस्कृत आणि संवेदनशील मनाचा लेखक आजच्या बदलल्या ग्रामजीवनाच्या काटेरी ओरखड्यांनी किती व्याकुळ आणि व्यथित होतो; याचे दर्शन 'अतर्वेध' या ग्रंथामध्ये आपणास दिसून येते. याला समाजाचे परिवर्तन म्हणायचे की, अध:पतन हाही एक प्रश्नच आहे. या लेखनामध्ये एक लेखक म्हणून श्री. गडाखांचे सर्वांगीण निरीक्षण आहे. स्वानुभवाचे कथन आहे. त्यावरचे चिंतन आहे आणि या परिवर्तनाचे दिग्दर्शनही आहे. ते स्वत:च प्रारंभी म्हणतात, "पूर्वी समाजामध्ये संथ गतीने होणारे बदल आता प्रचंड गतीने होत आहेत. गाव, शिवार, घर, समाज, मूल्ये, शेती, व्यापार, चालीरीती व विचार यात बदल होत आहेत. त्यातून आघात झाले. पण मी जे लिहिणार आहे, ते ६०/७० वर्षांत मी जे जीवन जगलो, अनुभवले त्यावर आणि टप्प्याटप्प्यावर बदललेली परिस्थिती, वातावरण, एकविसाव्या शतकातील डोळे दिपवून टाकणारा वेग, बधिर करणारं वातावरण, मुक्त अर्थव्यवस्था, स्फोटक परिस्थिती, तंत्रज्ञानाचा प्रभाव, त्याचे बरेवाईट परिणाम यावर साक्षीभावाने मी लिहिणार आहे."

"साठ-सत्तर वर्षापूर्वीची माणसे आणि ग्रामजीवन मला भारावून टाकते." असे जे गद्यकाव्य श्री. यशवंतराव गडाखांनी व्यक्त केले आहे; त्याचे कारण ही माणसे आणि ग्रामजीवन कृषिसंस्कृतीशी निगडित होते. आणि कृषिसंस्कृती पान, फूल, रस, रंग, स्वाद आणि नाद यांचे अलंकार ठेवून चिरलावण्याने समाजाला जोजवत होती. या संस्कृतीचा केवळ 'नाद' हा अलंकार घेतला तरी ती किती वैविध्याने नटलेली होती. हे आपल्या लक्षात येईल. वाऱ्याची शीळ, पानांची सळसळ, ओढ्याची खळखळ, पक्ष्यांची कुजबूज, गाईचे हंबरणे, वासराचा टाहो, घंटेचा नाद, प्रार्थनेचा ओंकार, बांगड्यांची किणकिण, जात्याची घरघर, बायकांची ओवी, मोटेची लकेर, पाणवठ्यावरची कुजबूज आणि दवांमुळे रंग ओले झालेल्या फुलपाखरांच्या पंखांची उघडझाप; या साऱ्यांतून निर्माण होणारा नाद माणसांना लपेटून जात होता. माणसाला तृप्त करून जात होता. कदाचित यातूनच ग्रामीण माणूस आत्मतृप्त होऊन जात असावा आणि जगतही असावा. हे वैभव आता पार लोप पावत चालले आहे. सोनईनगरीचे आठ महिने आपल्या पाण्याने पाय धुणारी कौतुकी आता शोधावी लागते, असे जे ते म्हणतात, तो नाश होत चाललेल्या संस्कृतीचाच कडवट अनुभव असावा. थोडक्यात काय, कृषिसंस्कृती चराचरात चैतन्य आणि ईश्वरी अंश मानणारी संस्कृती आहे. ही संस्कृती प्रेमावर उभी आहे. त्यागावर उभी आहे. भोगावर नव्हे. तिच्यात आता औद्योगिक संस्कृतीत परिवर्तन झाले आणि गेल्या दहा-वीस वर्षांपासून इंटरनेट आणि संगणक संस्कृतीत परिवर्तन झाले. त्याला गती आली मुक्त अर्थव्यवस्था,

खासगीकरण, जागतिकीकरण, शोषणावर आधारलेली अर्थव्यवस्था त्यात मिसळली! हे परिवर्तन आपण थांबवू शकत नव्हतो. काळाची गरज म्हणून साऱ्या देशांना ते स्वीकारणे अटळ होते; पण या बदलला किंवा परिवर्तनाला आपण जो मानवी चेहरा द्यायला हवा होता; तो देऊ शकलो नाही. त्यामुळे सगळ्या आघाड्यांवर प्रदूषण आणि पडझड सुरू झाली. कुटुंबाची पडझड आणि प्रदूषण, राजकारणाची पडझड नि प्रदूषण, पर्यावराचे प्रदूषण नि पडझड, प्रेम आणि विश्वास यात प्रदूषण शिरले. पडझड होत गेली. एखादे उदाहरण देऊन बोलायचे झाले तर असे म्हणता येईल की, पूर्वी व्यवहाराची आणि देण्या-घेण्याची काळजावर नोंद व्हायची नंतर ती कागदावर होऊ लागली. आता नोंद होतच नाही. जमिनी आणि संपत्ती तशीच हडपली जाऊ लागली. आणि नोंद झालीच तर बंदुकीच्या गोळीने फुफ्फुसाला भेग पडून केली जाते. ही पडझड आणि प्रदूषण श्री. यशवंतराव गडाखांनी कमालीच्या कळवळ्याने, राजकारण, समाजकारण, व्यापारउदीम, अर्थकारण, निवडणुका, कुटुंबव्यवस्था, आर्थिक व्यवहार, जीवनशैली, संपत्तीसंचय, लैंगिक जीवन, प्रशासकीय कारभार, तरुण पिढीचे जगणे या सर्व आघाड्यांवर कसे होत गेले; यांचे प्रभावी वर्णन केलेले आहे. आपण कळत न कळत वनभूमीतून स्मशानभूमीकडे चाललो आहोत.

आमची बदललेली जीवनमूल्ये आणि जीवनशैली यामुळे आमच्या प्रतिष्ठेच्या कल्पनाही पार वदलून गेलेल्या आहेत. पूर्वी दावणीला असणारे बैल आणि घरात असणारी धान्याची पोती यावर प्रतिष्ठा मोजली जायची. पूर्वी किती अनाथांच्या आणि निराश्रितांच्या हातावर घास ठेवला; यावर प्रतिष्ठा मोजली जायची. आता आमच्या मोजपट्ट्या बदलल्या आहेत. आता आम्ही आमची प्रगती संपत्तीत झालेल्या वाढीवर मोजतो आहोत. केवळ संपत्तीच्याच नव्हे, तर तुरुंगाच्या संख्येत झालेली वाढ; वृद्धाश्रमात झालेली वाढ, गुन्हेगारीत झालेली वाढ, दारूच्या दुकानात झालेली वाढ आणि बलात्कारात झालेली वाढ यांच्या आधारे मोजू लागलो आहोत. यालाच आम्ही प्रगती मानतो आहोत; ही प्रगती नव्हे, अधोगतीत झालेली प्रगती आहे; असेच मला म्हणावेसे वाटते.

समारोप म्हणून मला असे म्हणावेसे वाटते की, त्यांचे हे संपूर्ण लेखन 'स्व' आणि 'समाजा'चा शोध घेणारे आहे. उज्ज्वल भविष्यासाठी भूतकाळाचे स्मरण करणारे आहे. भेगाळत चाललेल्या कृषिसंस्कृतीला अधिष्ठान देणारे आहे. भौतिक प्रगतीला आत्मिक उन्नतीची साथ हवी असा संदेश देणारे आहे. दिशा हरवलेल्या परिवर्तनाला दिशा देणारे आहे. स्वत:च्याच हातांनी आत्मज्योत विझवणाऱ्या युवकांना, संस्कृतीचा मंगलदीप सांभाळण्याची प्रेरणा देणारे आहे. आणि साहित्यिक, सांस्कृतिक, भक्तिप्रवण उपक्रमांतून माणसे जोडता येतात, माणसे घडविता येता, माणसे निष्कलंक करता येतात, माणसे कर्तव्यसन्मुख करता येतात; याचा आदर्श घालून देणारे हे लेखन आहे म्हणूनच ते वाचकांना एकाच वेळी निर्भेळ आनंदही देते; आणि अस्वस्थही करून सोडते. उत्कृष्ट साहित्याची ही एक उत्कृष्ट कसोटीच मानली जाते. उत्कृष्ट कमाई मानली जाते. म्हणूनच 'अंतर्वेध' या ग्रंथाचे स्वागत केले पाहिजे. त्याशिवाय ते वाचकांचेही 'स्वगत' होणार नाही.

◇◇◇

**द. ता. भोसले**
पंढरपूर.
भ्रमणध्वनी : ९४२२६४६८५५



अनुक्रमणिका

टिपण — अंजली कुलकर्णी

*[महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या काही पुस्तकांची संक्षिप्त समीक्षा अंजली कुलकर्णी यांनी केली आहे.*
*–संपादक]*

### कवितेचा आनंद देणारा संग्रह 'कमळकाचा'

मराठी कवितेच्या प्रदेशातली एक मनस्विनी कवयित्री म्हणून सुमती लांडे यांची ओळख आहे. प्रकाशक, संपादक आणि कवयित्री या तिन्ही भूमिकांमधून गेली पंचवीस एक वर्षे त्यांनी आपल्या कामाचा वेगळा ठसा उमटवला आहे. 'कमळकाचा' हा सुमती लांडे यांचा जुना कवितासंग्रह. वीस वर्षांपूर्वी यातील कवितांचं चांगलं स्वागत रसिकांनी केलं होतं. आज या संग्रहातील कविता नव्या मुखपृष्ठासह, नव्या देखण्या मांडणीसह, आशयाचा घनदाटपणा अधोरेखित करणाऱ्या 'अक्षरचित्र' शैलीसह दुसऱ्या मुद्रणाद्वारे पुन्हा एकदा वाचकांसमोर अवतरल्या आहेत. प्रभाकर कोलते यांनी या पुस्तकाची 'अपूर्व' अशा प्रकारची मांडणी केली आहे, जी कवितासंग्रह हाती घेताच मन वेधून घेते.

'कमळकाचा'मधील कविता ही संवेदनांची कविता आहे आणि तिचा प्रत्ययही आपण संवेदनांनीच घेण्याचा आहे. अनुभववर्णन नाही तर संवेदनांचा थेट प्रत्ययही कविता देते. उदा.



*'श्वासांवरच्या*
*अंधाररेषा*
*गडद होत गेलेल्या*
*शरीरभर*
*गर्भकळा*
*दाटून आलेल्या'*

संवेदनांच्या कल्लोळांनी वादळलेलं एक उत्कट कवीमन या कवितांमधून दिसतं.

सुमती लांडे यांच्या कवितांमधून अत्यंत मनस्वीपणे जगणाऱ्या एका स्त्रीच्या संवेदनशील स्वप्नमग्न, पारदर्शक मनोविश्वाचं दर्शन घडतं: जगणं पचवून पुनश्च ताठपणे जगण्यात स्वत:ला रोवलेल्या तरीही मनाची कोवळीक हरवू न दिलेल्या स्त्रीचं ते मनोविश्व आहे, यातलं वेगळेपण मनावर उमदेपणानं ठसतं. जगणं स्वत:चं करायचं असेल, तर स्वत:च्या स्वप्नांचा क्रूस स्वत:च खांद्यावरून वाहावा लागतो, आख्ख्या आयुष्याएवढी किंमत द्यावी लागते; हे सत्य उमगलेली ही कवयित्री आहे.

मुळात या कवयित्रीला जगणं फार मुळापासून नाही समजलेलं आहे. 'प्रत्येक संध्याकाळ येताना आठवणींचे असंख्य जखमी थवे सोबत घेऊन येत' या वास्तवाचा तिनं स्वीकार केला आहे.

एका आत्यंतिक संवेदनशील जिवाची आयुष्याकडून असलेली किंचित अपेक्षा आणि दुनियादारीनं दिलेला भयाण अंधार यातील विपरीती, विसंगती सुमती लांडे यांनी टोकाच्या उत्कटपणे व्यक्त केली. त्या लिहितात–

*'बाहेरची बारा तासांची रात्र*
*आतला चोवीस तासांचा अंधार*

*मला एक पणती हवी होती*
*उजेड समजावून सांगणारी'*

केवळ चार ओळींत अनुभूतीचा केवढा तरी मोठा प्रदेश सुमती लांडे यांनी भरून टाकला आहे. अनुभवाचं एक संपूर्ण आवर्तन केवळ चार ओळींत पूर्ण करण्याचं एक विलक्षण सामर्थ्य या कवयित्रीत आहे, हे पाहून आपण स्तिमित होतो.

नातेसंबंधांवरही सुमती लांडे लिहितात तेव्हा संबंधांच्या तळाशी पोहोचून त्यातलं काहीतरी मूलगामी गवसलेलं आपल्याला त्या सांगतायत याचा अनुभव येतो. उदा.

*'संबंधातले*
*तापत*
*जाणारे*
*ऊन*
*दिवसागणिक*
*निगरगट्ट*
*होत*
*जाणारे*
*नाते'*

किंवा

*'रस्ता चालत जातो दूरवर*
*बुजवता येत नाहीत*
*खाचखळगे*
*त्याचे आपले*
*आपल्या त्याच्यातले'*

इतक्या नेमक्या शब्दांत दु:खाची दुखरी नस सुमती लांडे यांनी पकडली आहे.

मुळात जगणं हाच एक तुरूंग आहे, याची एखाद्या धारदार सुरीसारखी जाणीव सुमती लांडे यांना आहे. त्यामुळे परस्परांच्या तुरुंगी भिंतींवर धडका मारून रक्तबंबाळ होण्यातलं अटळ प्राक्तन त्यांनी एका कवितेत प्रत्ययकारी पद्धतीनं पोहोचवलंय. त्या म्हणतात–

*'माझ्या नसानसातून*
*रक्ताच्या धारा वाहत असतात*
*त्या कुणाच्या जखमांपर्यंत*
*चिरेबंद*
*भिंतीतूनही....'*

'कमळकाचा' या संग्रहामधून सुमती लांडे यांनी आत्मनिर्भर, आत्मविश्वासू आणि प्रखर स्त्रीत्वाचा सुंदर अनुभव दिला आहे.

*'शेणामेणाचं*
*व्हायला*
*तिनं*
*ठाम नकार दिला'*

अशा ठाम शब्दांत एका स्वकर्तृत्वावर विश्वास असणाऱ्या, तेजस्वी, खंबीर स्त्रीचं व्यक्तित्व त्यांनी उभं केलं आहे. समाज या स्त्रीकडे कसा पाहातो, काय बोलतो याची पर्वा न करता ही स्त्री निवडलेल्या वाटेनं खंबीरपणे चालते आहे. याचा प्रत्यय देणाऱ्या काही कविता या संग्रहात आहेत.

सुमती लांडे यांच्या अनोख्या भाषाशैलीचा त्यांच्या अनुभवाच्या आशयसंपृक्त होण्यामध्ये मोठा वाटा आहे. त्यांच्या कवितांचा आकृतिबंधही अनोखा, स्वत:चाच असा आहे, किंवहुना आशय आकृतीत बंदिस्त होण्यासाठी त्यांच्या जाणिवेने तो निवडला असावा. फार थोड्या शब्दांमध्ये अनुभूतीचा संपूर्णपणा पूर्णपणे व्यक्त करण्याचे सामर्थ्य या कवयित्रीकडे आहे. देखण्या शब्दकळेबरोबरच वेगळ्या प्रतिमांचे अनुभवात सहजपणे विरघळणे हे देखील या कवितांचे एक वैशिष्ट्य आहे. 'काळोखाचा तटतटलेला कणकण', 'देखण्या लॅण्डस्केपसारखा तू', 'आईनं दिलेलं दुराव्याचं दूध', 'पांढऱ्या पालीच्या वळवळणाऱ्या पालीसारखा रस्ता' अशा वेगळ्या प्रतिमांमुळे ही कविता वेगळ्याच अनुभूतींच्या प्रदेशात वाचकाला घेऊन जाते.

विजय तेंडुलकरांनी म्हटल्याप्रमाणे एक 'पूर्ण' कविता वाचल्याचा आनंद हा कवितासंग्रह देतो.



अनुक्रमणिका

**'कमळकाचा' (काव्य)**
लेखक : सुमती लांडे
*प्रकाशक :* शब्दालय श्रीरामपूर (पुनरावृत्ती २०१२)
*पृष्ठे :* १९४
*मूल्ये :* रु. २००/-

**वंचितांच्या जीवनसंघर्षाची आवेगी कहाणी 'धुपात्री'**

'धुपात्री' ही गणपत भिसे यांची अत्यंत वेगळ्या विषयावरची कादंबरी 'जनशक्ती वाचक चळवळी'ने नुकतीच प्रकाशित केली आहे.

साठोत्तरी मराठी साहित्यामध्ये दलित, भटके विमुक्त, आदिवासी, ग्रामीण साहित्यिकांनी निर्माण केलेल्या साहित्य-कृतींमुळे, अलिबाबाची गुहा उघडावी आणि एखादा मोठा खजिनाच गवसावा त्याप्रमाणे मराठी साहित्य समृद्ध झाले. समाजाच्या वेगवेगळ्या घटकांमधील कष्टकरी, वंचित उपेक्षित वर्गाच्या व्यथावेदनांना, अन्याय, अत्याचारांना या साहित्यप्रवाहामुळे आवाज मिळाला.

आज दलित समाजिक चळवळ आणि दलित साहित्याची चळवळ थंडावली आहे का अशी चर्चा सुरू आहे. या पार्श्वभूमीवर 'धुपात्री' ही मांग समाजाची, शेतकरी-शेतमजूरांची व्यथा, त्यांचे प्रश्न चव्हाट्यावर मांडणारी कादंबरी प्रकाशित झाली आहे. त्यामुळे या कादंबरीचे मन:पूर्वक स्वागत करायला हवे.



स्वत: गणपत भिसे हे एक सामाजिक न्याय आंदोलनाचे सक्रिय कार्यकर्ते आहेत आणि या संघटनेच्या माध्यमातून महाराष्ट्रातील मसणवट्याचा प्रश्न सोडवण्याच्या दृष्टीने ते काम करीत आहेत. कदाचित म्हणूनच धुपात्री या कादंबरीचा केंद्रबिंदू मसणवट्याचा प्रश्न हाच झाला आहे. जरी मसणवाट्याच्या प्रश्नापर्यंत कादंबरी उत्तरार्धात पोहोचते, तरीसुद्धा गणपत भिसे यांचा हेतू वाचकांना याच प्रश्नाच्या भीषण स्वरूपापर्यंत पोहोचवण्याचा आहे, ही बाब जाणवल्याशिवाय राहात नाही.

कादंबरीचा प्रारंभ आणि पूर्वार्ध मांग जमातीच्या माणसांच्या नरकवजा जगण्याचे अत्यंत वास्तवदर्शी चित्रण करतो. त्यांच्या जगण्याच्या रीती, दु:ख-आनंदाचे प्रहर, अभावग्रस्त जगण्यातही त्यांनी जपलेले नीतिनियम, त्यांची मानसिकता, लग्नविधी, कारवं सारखे आनंदाचे उत्कटपणे जगलेले क्षण, पाटलाच्या घरी वर्षानुवर्षे त्याच कानतुटक्या कपातून मिळणारा, लांबून धार सोडलेला चहा, मांगांचं दारू पिणं, भांडणं करणं, शिव्या देणं, शिव्या देताना शरीराचा एकदेखील अवयव न विसरणं, मांग महारांमधली आपापसांतली तेढ, दोघांनी एकत्र येण्याची दोघांनाही वाटणारी गरज, पण जातीचा अभिमान न सोडण्यापायी फिकट होणारा संघर्ष, (अण्णाभाऊ साठेंच्या जयंतीच्या नुसत्या नावाला राहिलेल्या उपचारांतला मांगांना जाणवणारा फोलपणा मिरवणुकीत सवर्णांकडून झालेली दगडफेक, गावगुंडांची दहशत आणि त्यातून अनेकांना गाव सोडून जावं लागणं) कारव्यासारख्या प्रसंगी आसपासच्या गावांमधून जमणारे पाव्हणेरावळे, मुक्कामाला आलेले पंचक्रोशीतले नामांकित साळबा पोतराज, लिंबाजी पोतराज, वाळू पोतराज, शिवाजी पोतराज, हलगी, ढोलकी आणि सनईच्या साथीनं पोटातली आतडी गळ्यापर्यंत येईस्तोवर टिपेला पोहोचणारा साळबा पोतराजाचा आवाज, त्यांच्या अंगात संचारलेली अद्भुत शक्ती आणि शेवटी

धुराजीच्या बापाच्या अंत्यविधीवरून गावात माजलेला बखेडा, दोन-तीन दिवस सडत पडलेला राजारामाचा देह आणि मांग लोकांना स्मशानभूमीच्या जागेवरून बेदखल करून ती जमीन हडपायाचा गणपतराव पवारांचा कट, त्यावरून वेठीला धरलेला अवघा मांग समाज, त्यांचा संघर्ष अशा सगळ्या घटना-प्रसंगांमधून मांग समाजाच्या अवघ्या दारुण जीवनाचे चित्र गणपत भिसे यांनी अत्यंत आवेगपूर्ण, उत्कट भाषेमध्ये रेखाटले आहे.

काहीच काम न मिळाल्यानं आज पोटात ढकलायचं काय या चिंतेनं गाडग्या मडक्यातून ओंजळभर ज्वारीचे दाणे शोधणाऱ्या केवळेला जनाबाई सांगते– "ते ज्वारीचं बेवडं हाय... एकांद्या गरीब कुणब्याला ब्याची अडचण आली तर हेच मोती उद्या पाचाचे पन्नास होतील." अभावग्रस्त जिण्यातही कुणब्याची अडचण ओळखणारी जनाबाई याच समाजात सापडते. एखाद्या चलचित्रपटाप्रमाणे वेगवेगळ्या घटनाप्रसंगांमधून आख्ख्या मांग समाजाची परिस्थिती, विपरीत वास्तव मानसिकता आणि मसणवट्यासारखे, शिक्षणासारखे त्यांचे प्रश्न यावर नेमका झोत टाकणारी ही एक हृदयद्रावक कहाणी आहे.

**'धुपात्री' (कादंबरी) २०१२**
लेखक : गणपत भिसे
*प्रकाशक :* जनशक्ती औरंगाबाद
*पृष्ठे :* १६०
*मूल्ये :* रु. १५०/-

### सूर्यपूजकाचं कृतज्ञ स्मरण

कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांच्या कवितांच्या ओळखीच्या अनोळखीच्या विविध पैलूंना उजाळा देणारं प्रवीण दवणे यांचं 'सूर्यपूजक कुसुमाग्रज' हे पुस्तक नुकतंच प्रकाशित झालं आहे.

तसं तर कुसुमाग्रजांच्या कवितेवर गेल्या अनेक वर्षांमध्ये अनेकांनी पुष्कळ लिहिलं आहे. तरीही



दशांगुळे वर शिल्लक राहावी अशीच कुसुमाग्रजांची कविता आहे. प्रत्येक वाचनात तिची अनेक अस्पर्श स्थळं सापडतात, अनेक अनोखे सूक्ष्म आशयतंतू गवसतात, अनेकवेळा एखाद्या कवितेतील गर्भित आशय उलगडल्याने आपण चकित होतो, तर अनेकदा कवितांमधील नाद लयकारीपूर्ण अभिव्यक्तींनं, विविध रसांच्या परिपुष्टतेनं आपण भारावून जातो, त्यांच्या कवितेने दिलेल्या जीवनदृष्टीपुढे आपण नतमस्तक होतो; आणि हे पुन:पुन्हा घडते.

'प्र-योजना'त म्हटल्याप्रमाणे प्रवीण दवणे यांना दरवेळचे नव्याने जाणवणारे कुसुमाग्रजांचे अद्‌भुत प्रतिभा-ऐश्वर्य सर्वसामान्य रसिकांपर्यंत पोहोचवावे असे वाटले; आणि कुसुमाग्रज जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांनी एरवी व्यवसायमग्न असणाऱ्या पण उरात कवितेचे प्रेम जपणाऱ्या रसिकांसाठी 'सूर्यपूजक कुसुमाग्रज' हे सूत्र घेऊन महाराष्ट्रभर व्याख्याने दिली. त्या व्याख्यानांतील साररूप चिंतन 'सूर्यपूजक कुसुमाग्रज' या पुस्तकात त्यांनी समाविष्ट केले आहे.

या पुस्तकामधून प्रवीण दवणे यांनी कुसुमाग्रजांच्या कवितेतील अनेक वैशिष्ट्यांचा एका कृतज्ञ भावनेने, आस्थापूर्ण प्रेमाने आस्वाद घेतला आहे. हातातल्या कर्मठ आणि कठोर चिकित्सेच्या छिद्रान्वेषी भिंगाखाली कविता धरण्याऐवजी एखादे भरजरी पवित्र महावस्त्र, राजवस्त्र अतीव आदराने न्याहाळावे तशी त्यांनी कुसुमाग्रजांची कविता पाहिली आहे; आणि तेच



अनुक्रमणिका

महावस्त्र त्याच्या रंग, पोत, सौंदर्यासह रसिकांसमोर उलगडून दाखवले आहे. पुस्तकाची सुंदर मांडणीही त्याच भावनेने केली आहे.

कुसुमाग्रजांच्या विविध आशयसूत्रे घेऊन आलेल्या कवितांवर प्रवीण दवणे यांनी इथे लिहिले आहे त्यामध्ये कुसुमाग्रजांच्या 'कोलंबसाचे गर्वगीत', 'गर्जा जयजयकार', 'कणा' किंवा 'पृथ्वीचे प्रेमगीत', 'प्रेमयोग' सारख्या कुसुमाग्रजांच्या लोकांच्या तोंडी असणाऱ्या प्रसिद्ध कवितांबरोबरच काहीशा दुर्लक्षित परंतु सकस कवितांचाही समावेश त्यांनी जाणीवपूर्वक केला आहे. प्रसिद्ध कवितांच्याही पलीकडे कुसुमाग्रजांची कविता किती दूर आणि खोल पसरलेली आहे हे दाखविण्याचा प्रयत्न त्यांनी या निमित्ताने केला आहे, तो वैशिष्ट्यपूर्ण वाटतो.

कुसुमाग्रजांची देव आणि देवत्व यासंबंधीची तेजाधी एकरूप असणारी कल्पना, त्यांचं ईश्वरविषयक चिंतन, सजग दृष्टीने समाजाकडे बघताना त्यांना दिसणारं भयावह समाजचित्र त्यातील विषमता, शोषणानं विषण्ण होणारं त्यांचं कविमन, बाबा आमटच्यांच्या प्रकाशाच्या देवळात त्यांचं भक्तपण स्वीकारणारी त्यांची तेजग्रहण करणारी मानसिकता, प्रेमभावनेतही तेजाचे, भव्यदिव्यतेचे आकर्षण अभिव्यक्त करणारी त्यांची ओजस्वी लेखणी, त्यांची एकाच वेळी निखाऱ्यासारखी धग असलेली आणि प्रेमळ, उबदार, आश्वासक, मऊ रेशमी शब्दकळा, त्यांच्या कवितांमधून सातत्याने न येणारा समतेचा, बंधुत्वाचा, स्वातंत्र्याचा आग्रह आणि त्यांची मानवतावादी जीवनदृष्टी कुसुमाग्रजांच्या कवितेच्या या सगळ्या वैशिष्ट्यांची चर्चा प्रवीण दवणे यांनी सूक्ष्मपणे केली आहे.

कुसुमाग्रजांचं महानपण केवळ त्यांच्यातील प्रतिभावंतापुरतं मर्यादित नव्हतं, तर त्यांच्यातल्या अपार माणूसपणामुळे, करुणेमुळे ते अलौकिक ठरलं. कुसुमाग्रजांचं हे माणूसपण अधोरेखित करताना प्रवीण दवणे यांनी कुसुमाग्रजांच्या कवितांमधून येणाऱ्या दुर्लक्षित समाजघटकांच्या शोषणाची चित्र दिसणाऱ्या कवितांकडे निर्देश केला आहे.

आजच्या समाजातलं भीषण दारिद्र्य, राजकारणी माणसांमधली स्वार्थांधता आणि विलासात मग्न समाजाची संवेदनशीलता यावर भेदक आणि उद्वेगमुक्त उपहासानं भाष्य करणारी कुसुमाग्रजांची कविता आहे– ते म्हणतात–

*'बुडू द्या–*
*मूल बुडाले म्हणजे सचिवालय*
*पाच ताऱ्यांचे ताजमहाल*
*अथवा ब्रेबॉर्न स्टेडियम*
*बुडाले नाही–'*

कुसुमाग्रजांच्या कवितेतलं हे अस्वस्थ होणं हे त्यांच्यांतल्या कार्यकर्त्यांचं अस्वस्थपण आहे हे सांगून प्रवीण दवणे यांनी कुसुमाग्रजांना आदिवासी वस्तीमध्ये पाड्यापाड्यावर, प्रत्यक्ष जाऊन दीनदु:खितांसाठी काम केलं आहे, या अप्रसिद्ध माहितीकडे लक्ष वेधलं आहे.

प्रवीण दवणे यांनी कुसुमाग्रजांच्या कवितांमधून साकारली गेलेली काही आधुनिक आदरस्थाने या वैशिष्ट्यांवरही प्रकाश टाकला आहे. त्यामध्ये बाबा आमटे, बाबासाहेब आंबेडकर, ज्योतिबा फुले यांच्याविषयी अतीव आदराने लिहिलेल्या कविता तर आहेतच, पण सानेगुरुजी, केशवसुत, बालकवी अशा व्यक्तिमत्त्वांवरही त्यांनी भारावून लिहिले आहे. ख्रिस्तांचं एकाकीपण लाभलेल्या बाबा आमटे यांना त्यांनी 'संत' म्हणूनच संबोधलं आहे.

कुसुमाग्रजांच्या या आणि अशा वेगळ्या कवितांची नोंद करत त्यावर सुरेख भाष्य करणारे, प्रवीण दवणे स्वत: कवी असल्यामुळे कवीचं हृदय जाणणारं हे पुस्तक आहे.

**सूर्यपूजक कुसुमाग्रज**
लेखक : प्रवीण दवणे
*प्रकाशक :* नवचैतन्य प्र. मुंबई
*पृष्ठे :* १३८
*मूल्ये :* रु. १६०/-



अनुक्रमणिका

**'भारत जोडो' यात्रेचा अन्वयं - 'उसवलेले दिवस'**

गतकालीन घटनांचा अन्वय वर्तमानात पुनःपुन्हा लावण्याची माणसाची प्रवृत्ती असते. भूतकाळात घडून गेलेल्या घटनांना तो फिरून फिरून तपासून बघत असतो. मग त्या घटना सामाजिक असोत की वैयक्तिक. सामाजिक घटनांकडे चिकित्सकदृष्टीने पाहण्याने इतिहासाचा योग्य तो अन्वय लावता येतो आणि त्या प्रकाशात वर्तमान जीवनाचाही अर्थ लावणे शक्य होते. इतिहासाच्या अभ्यासकांचा तोच आस्थेचा विषय असतो.

इतिहासाचे अभ्यासक आणि पुरोगामी चळवळीतील एक कार्यकर्ते शाहू पाटोळे यांनी १९८५-८६ मध्ये बाबा आमटे यांनी काढलेल्या 'भारत जोडो' या यात्रेचा अनुभव त्या त्यावेळी डायरीवद्ध केला होता. तोच डायरीवद्ध अनुभव आता 'भारत जोडो' या पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित झाला आहे.

७०-८० ची दशके ही महाराष्ट्रासाठी अत्यंत चैतन्यपूर्ण आणि भारलेली दशके होती. दलित चळवळ आदिवासी, स्त्री, ग्रामीण, कामगार चळवळ अशा अनेकविध चळवळींनी पुरोगामी महाराष्ट्र घडत होता. जे जे प्रस्थापित त्याला त्याला नकार देऊन परिवर्तनाची कास धरणाऱ्या तरुण पिढीचा एक वर्ग तयार होत होता. हा वर्ग सजगतेने आजूवाजूला पाहात होता, अभ्यास, विचार करत होता आणि स्वतंत्र बुद्धीने परिवर्तनाचे मार्ग शोधत होता, बदलाच्या लढाईची हत्यारे शोधत होता.

या काळात आनंदवनामध्ये रचनात्मक काम उभे करून महारोग्यांसाठी, अनाथांसाठी, दीनदुवळ्यांसाठी झटणारे बाबा आमटे हे समाजवाद्यांचे दैवतच बनले होते. जयप्रकाश नारायणांच्यानंतर समाजवादी चळवळीत निर्माण झालेली पोकळी बाबा आमटेच भरून काढतील असा एक भावडा आशावाद समाजवाद्यांनी जोपासला होता. तशात १९८५ मध्ये बाबांनी 'भारत जोडो'ची हाक दिली.




तोपर्यंत संपूर्ण भारतात आडवी आणि उभी अशा दोन सायकलयात्रा काढून भारतीय तरुणांमध्ये जागृती करण्याचे, भारतातील विविध प्रांतांमधील जनतेला परस्परांशी जोडून घेण्याचे आवाहन करण्याचे, आणि ठिकठिकाणी दीनदुबळ्यांशी संपर्क करून, भेटीगाठी घेऊन त्यांना समजून घेण्याच्या उद्देशाने 'भारत जोडो' यात्रेचा आरंभ झाला. या यात्रेत भारतभरातील जवळजवळ १२० तरुण सामील झाले, त्यातच शाहू पाटोळे हा एक बावीस-तेवीस वर्षीय युवक देखील होता. आग्र्याला गेलो तर ताजमहाल पाहाण्याऐवजी दिल्लीतील रिक्षावाल्यांच्या संघटनेला भेटू अशा बाबांच्या भूमिकेमुळे एका अनावर ओढीने 'भारत जोडो'त सामील झालेला हा एक तरुण. परंतु प्रत्यक्षात 'जोडो'त त्यांना आणि इतर मुलांना आलेला अनुभव हा अत्यंत विपरीत आणि अपेक्षेपेक्षा एकदम विसंगत असाच होता. यात्रेत सामील झाल्याच्या पंधरा दिवसांतच लेखकाला कळून चुकलं की बाबा आमटे यांच्याजवळ कोणताही ठोस कार्यक्रम नाही, 'जोडो'ची स्पष्ट कल्पना त्यांच्याजवळ नाही, नामांतर, आरक्षणाच्या तेव्हाच्या ऐरणीच्या मुद्द्यांवर त्यांनी कोणतीही ठोस भूमिका 'जोडो'च्या काळात आणि एरवी मांडलेली नाही. सुरुवातीला यात्रेची जी एक आचारसंहिता ठरवली होती तिचे पालन बाबा आणि त्यांच्याजवळच्या लोकांनी केले नाही. अशा अनेक आरोपांच्या फैरी या पुस्तकात आपल्याला आढळतात.

शाहू पाटोळे यांनी 'जोडो'च्या नियमाप्रमाणे रोजच्या

अनुभवांची, निरीक्षणांची नोंद डायरीमध्ये केली होती. ही डायरी, कोणताही फेरफार न करता पुस्तकामध्ये रूपांतरित झाली आहे. ही संपूर्ण डायरी वाचली तर 'जोडो'च्या दरम्यान भ्रमनिरास झालेल्या यावेळच्या 'पोरां'चं मनचित्र आपल्या डोळ्यांसमोर स्पष्ट उभं राहातं.

बावांनी 'आनंदवन' चांगल्या पद्धतीने उभं केलं. त्या कामात त्यांनी स्वत:ला झोकून दिलं; परंतु 'भारत जोडो'मध्ये मात्र ते अपयशी ठरले असं अनुमान शाहू यांनी या ठिकाणी काढलं आहे. या निष्कर्षानं बावांना दैवत मानणाऱ्या अनेकांना धक्का बसेल. परंतु, बावा माणूस होते. आणि सार्वजनिक व्यक्ती होते. त्यामुळे त्यांच्या कृतींची विचारव्यूहाची निरोगी चर्चा-चिकित्सा व्हायला हवी असं पाटोळे यांनी प्रतिपादन केले आहे. तशी चिकित्सा करण्याचा प्रयत्न त्यांनी या पुस्तकात केला आहे.

या पुस्तकात जाणवणारी एकच कमतरता सुचवावीशी वाटते ती म्हणजे, पाटोळे यांनी १९८६ सालची डायरी प्रकाशित केली आहे. त्यानंतर पुलाखालून बरेच पाणी वाहून गेले आहे. बावांचे कामही १९८६ ते २०१० पर्यंत लोकांसमोर आले आहे. तेव्हा पाटोळे यांनी पुस्तकाला एखादे परिशिष्ट जोडून १९८६ ते २०१० या काळातल्यादेखील बाबांच्या कामाची चिकित्सा करायला हवी होती– म्हणजे केवळ ऐतिहासिक घटना आणि त्याचा अन्वय इथपर्यंतच या पुस्तकाची व्याप्ती मर्यादित न राहाता ती समकालापर्यंत येऊन भिडली असती. असो.

तरीही 'भारत जोडो' यात्रेसारख्या घटनेवर आजवर कुणीही काहीही लिहिलेले नाही ही परिस्थिती लक्षात घेता पाटोळे यांनी या विषयाला तोंड फोडण्याचे धाडस दाखवले त्यावद्दल त्यांचे अभिनंदन करायला हवे.

**पर्णसूक्त (कवि संजय बोराडे)**

सशक्त ग्रामीण संवेदनांची अभिव्यक्ती करणारा कवी म्हणून संजय बोरुडे यांची ओळख आहे. त्यांचा 'पर्णसूक्त' हा कवितासंग्रह जनशक्ती वाचक चळवळीतर्फे प्रकाशित झाला आहे.

'पर्णसूक्त' ही एक theam based कविता आहे. पानांची कहाणी हे या संग्रहातील सर्व कवितांचं आधारसूत्र आहे; आणि हे सूत्र धरून पानांची ही कहाणी वेगवेगळ्या पद्धतीने आपल्यापुढे येत राहाते. एकाच एकपेशीय जिवातून अनेक जीव जन्माला यावे तशा या एकाच सूत्रातून ही कविता 'पानोपानी' बहरली आहे.



पात्रांची ही कहाणी पानांचं वेगळेपण, मोठेपण, समंजसपण, उदारपण आपल्याला सांगत राहाते. मुळात संजय बोरुडे यांनीच सुरुवातीला सांगितल्याप्रमाणे या कविता केवळ पानांच्या आहेत असं नाही. पानांच्या तर त्या आहेतच; परंतु त्यापलीकडे जाऊन एकंदरीतच सृष्टीमधले जगण्याचे नियम, रीती, विपरीती शोधण्याच्या देखील या कविता आहेत आणि मानवी जीवनातील संगती-विसंगती आणि नियतीचाही शोध घेण्याचा ध्यास या कवितांना लागलेला दिसतो. खरंतर जगणं समजून घेण्याचाच हा प्रयत्न आहे, आणि तो किती जटिल आहे हे कवीला समजलं आहे म्हणूनच संग्रहातली पहिली कविता आपल्याला सांगते,

*'इतके सोपे नसते*
*पानांना समजून घेणे*
*सोशिकतेचा कस लावून*
*उपसावा लागतो हिरवाईचा तळ'*





अनुक्रमणिका

जगण्याची जटिलता समजून घेण्यासाठी बोरुडे यांनी पान या एका समान प्रतिमेची योजना या संपूर्ण संग्रहासाठी केली आहे. मात्र ही प्रतिमा प्रत्येक वेळी वेगवेगळ्या संदर्भामध्ये, परिस्थितींमध्ये वापरली असल्याने प्रत्येक कवितेत ती वेगळी अर्थवत्ता घेऊन प्रकटते. उदा.

*'शुद्ध कांचनवर्खी*
*उन्हांवर*
*पिंड आमचा पोसला आहे...*
*कृषि विद्यापीठांमधून*
*प्रसवलेल्या वाणांवर नव्हे...*

या कवितेतला 'पानांचा' सूर वेगळा आहे. इथे स्वत:च्या अस्सलतेचा, खरेपणचा, शुद्ध अभिमान डोकावतो. तर दुसऱ्या एका कवितेत (क्र.२१) कवी लिहितो–

*'पिवळी पानं झडणं*
*समजू शकतं*
*पण ऐन बहरात असलेलं*
*एखादं हिरवं पान*
*देठापासून*
*अलग होणं....'*

यातील नियतीची अटळता, अपरिहार्यता अधोरेखित करताना कवीचा स्वर आपसूक व्याकुळ होतो. पानाच्या एकाच प्रतिभेच्या आधारे विविध अनुभूतींचा थेट प्रत्यय बोरुडे देतात.

'पान तरुण असते, पान करुण असते' सारख्या ओळींमधून मानवी संवेदना, भावभावनांचाच प्रत्यय कवीने दिला आहे. एका अर्थाने मानवी भावभावनांचे आरोपण त्यांनी झाड, पान, फूल, फांद्या, वणवा या निसर्ग घटकांवर केले आहेत. यातील संबद्धता या कवितांमध्ये अधोरेखित झाली आहे. निसर्ग रूपांचा गौरव ही भारतीय मातीची मानसिकता या कवितांमध्ये ठळकपणे दिसते. निसर्ग आणि माणूस पानांचा फुलांशी, पानांचा फांद्यांशी, पानांचा खोडाशी, मुळाशीं आणि समग्रतेनं पानांचा झाडांशी असणारा संबंध, त्यातली परस्परपूरकता, पानांचं या सगळ्यामध्ये असणारं स्थान या सगळ्यावर भाष्य करताना बोरुडे मानवी जीवनावरच भाष्य करत आहेत हे जाणवल्याशिवाय राहात नाही. उदा. कविता क्र. २३ मध्ये ते म्हणतात–

*'केवळ शुष्क फांद्यांच्या*
*अन् काटक्यांच्या सहाय्याने*
*आपण पांथस्थाचा थकवा*
*बुजवू शकत नाही....*
*याची झाडाला जाण आहे'*

याच कवितेत शेवटी ते म्हणतात–

*'पानं आहे तोपर्यंतच*
*झाडाला मान आहे'*

संजय बोरुडे यांनी पानांच्या या व्यथा, वेदना, संवेदना व्यक्त करण्यासाठी जो आकृतिबंध स्वीकारला आहे तोही मोठा वैशिष्ट्यपूर्ण आहे. कित्येक कवितांत एका ओळीत एक किंवा दोनच शब्दांचा वापर करून त्यातील आशयाला उठाव देण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. अल्पाक्षर रमणीयत्व आणि तरल शब्दयोजना हे या शैलीचं विशिष्ट्य आहे.

संग्रहाचं मुखपृष्ठ आणि आतील रेखाटने कवितांच्या आशयात मोलाची भर घालणारी आहेत. त्यासाठी अशोक डोळसे आणि संतोष तांदळे यांचा उल्लेख करणं आवश्यक आहे. एक वेगळा संग्रह हाती पडल्याचा आनंद वाचक नक्कीच अनुभवतील एवढे श्रेय या कवितांना पुरे आहे.

(पर्णसुक्त – कवि संजय बोराडे, जनशक्ती २०१२)

**सश्रद्ध, संस्कारशील काव्यमय ललितलेखन**
**वार्ता सांजफुलाच्या– शिरीष गंधे**

'वाती सांजफुलांच्या' हा शिरीष गंधे यांचा ललितलेख संग्रह साक्षात प्रकाशनाने बाजारात आणला आहे.



अनुक्रमणिका



एकूण एकवीस छोट्या-छोट्या लेखांमधून शिरीष गंधे यांनी तीस-पस्तीस वर्षांपूर्वीच्या गावाचं, तिथल्या संस्कृतीचं, परिसराचं, माणसांचं, माणसांमाणसांमधल्या नात्यांचं, अत्यंत हृद्य चित्रण केलं आहे.

बालपणापासून स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण करणाऱ्या साऱ्या घटकांविषयीचं एक कृतज्ञ स्मरण हे या सर्व लेखांमधून पुढे येणारं एक महत्त्वाचं आशयसूत्र आहे. भोवतालकडे कमालीच्या औत्सुक्यानं बघणाऱ्या एखाद्या बालकाचं संवेदनशील, संस्कारशील मन यातील प्रत्येक लेखातून जाणवतं आणि भोवतालाचा अन्वय लावण्यातील प्रगल्भताही दृष्टीस पडते.

लेखकाचा बालपणाचा सारा सुखाचा काळ ज्या प्रवरामाईच्या परिसरात गुजरला. त्या काळाचा, त्या परिसराचा, त्या संस्कृतीचा एक अमिट ठसा लेखकाच्या मनावर उमटला आहे. त्या परिसरानं त्याला श्रद्धेचं बळ दिलं, जीवनावरचा, मानवतेवरचा विश्वास दिला, भावनाशीलतेचं देणं दिलं; मुख्य म्हणजे याच परिसरानं लेखकामधला प्रतिभावंत जागविला. जगण्याची सारी शिरोदी अशी या परिसरानंच पुरवली. मग त्या परिसरातली प्रवरामाई नदी असो, वा घरातलं विविध फुलांच्या सुगंधानं घमघमलेलं गूढ आश्वासक देवघर असो किंवा मग 'मानजा'चा संस्कार मनावर करणारी पतंग काटाकाटीच्या खेळातली मित्रमंडळी असो वा तपस्व्यासारखा भासणारा लिंबदेव असो किंवा कुतूहल, भीती, आश्चर्य, प्रसन्नता असे सारे भाव घेऊन येणारी अनेक गोष्टींची लागण, मनाला लावणारी दिवेलागणीची वेळ असो या सगळ्यांतून एक प्रेमळ, भावनाशील सुसंस्कृत, सश्रद्ध, अगत्यपूर्ण, विवेकी आणि समंजस, प्रगल्भ व्यक्तिमत्त्व घडत गेलं. निसर्ग, वास्तू, माणसे, नाती, समाज या सगळ्यांनी मिळून जीवन आहे तसं आनंदाने स्वीकारायला शिकवलं. दु:खाच्या प्रहरांचाही स्वीकार समंजसतेने करायला शिकवले. या सगळ्यांविषयी वाटणारी ममता, आपलेपणा, कृतज्ञता यांचा उत्कट भावाविष्कार म्हणजे 'सांजफुलांच्या वाती' हे पुस्तक.

शीर्षकापासूनच भाषेची अनुभूतीची काव्यात्मकता जपणं शिरीष गंधे यांना साधलं आहे. 'सांजफुलांच्या वाती' या शीर्षकातील सांजफुले आणि वाती असा प्रत्येक शब्द स्मरणरंजन, सश्रद्धता आणि जगण्याच्या उत्सवात मनापासून रमणारं मन या गोष्टी अधोरेखित करतो. या पुस्तकातील सर्वच लेखांची भाषा शिरीष गंधे यांच्या तरल, भावोत्कट, काव्यमय भावस्थितीचे प्रत्यय देणारी आहे. अरुणा ढेरे यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे हे ललित लेखन कवितेच्या गळ्यात गळा घालणारे असेच झाले आहे. जे कवितेत न मावता ओसंडून बाहेर वाहू लागते ते ललित असे ललित लेखनाबद्दल म्हणता येते. शिरीष गंधे यांचे लेखनही त्याच जातकुळीचे आहे. या सर्व लेखांमधील अनुभवाची छोटी-छोटी केंद्रे, त्यातील सूक्ष्म निरीक्षणे आणि काव्यमय प्रत्ययकारी भाषा यामुळे हे लेखन वाचकांस गुंगवून ठेवणारे झाले आहे. आजच्या यांत्रिक, धकाधकीच्या जीवनात स्मरणरंजनाचे असे चार क्षण नक्कीच धावणाऱ्या माणसाला क्षणभर रेंगाळायला लावतील, स्वत:च्या सुगंधात न्हाऊ घालतील.

◊◊◊

**अंजली कुलकर्णी**
३ विघ्नहर अपार्टमेंट्स,
जयवर्धमान सो.सा. बिबवेवाडी पुणे ३७
मोबाईल : ९९२२०७२१५८

टिपण

# आम्ही मायदेशी, मुलं दूरदेशी

– प्रमिला राऊत

पुस्तकाच्या नावावरूनच आतील विषयाची कल्पना येते, असं एक पुस्तक अलीकडेच वाचलं. नीलिमा बोरवणकरांचं 'आम्ही मायदेशी, मुलं दूरदेशी' हे पुस्तक. परदेशी गेलेली मुलं आणि येथे स्वदेशात असलेले त्यांचे आई-वडील — यांच्या मानसिक आंदोलनाचा अभ्यास करण्याचे त्यांनी ठरविले. हा प्रकल्प हाती घेऊन महाराष्ट्रातील अनेक गावांतील पालकांना आणि त्यांच्या परदेशस्थ मुलांना भेटून त्यांच्या मुलाखती घेतल्या आणि ती निरीक्षणे वाचकांपुढे मांडली. अनेक पालकांनी त्यांच्या काळजातील व्यथा, आनंद, वेदना लेखिकेपुढे उलगडल्या. हल्ली परदेशात मुलांनी जाण्याचं प्रमाण खूप वाढलंय, त्यासंबंधीच्या कथा, लेख प्रसिद्ध होत असतात, ते वाचताना वाचक हळवा होतो. उतारवयात एकटेपणाला सामोरं जाण्याची कारणं अनेक आहेत. मुलांचं परदेशगमन हे त्यांपैकी एक, एवढंच. घरात चार माणसं असूनही वयोवृद्धांच्या वाट्याला एकटेपण येतंच की! ज्यांना अपत्यच नसतं ते वृद्धापकाळात कुणाच्या आधाराने जगतात? परदेशी गेलेली आपली मुलं परतणार नाहीत, याची खात्री असलेले वयोवृद्ध आणि अपत्यहीन जोडपी यांच्या उद्‌भवणाऱ्या समस्यांत काय फरक असतो?

प्रत्येक वृद्धाच्या समस्या वेगळ्या असल्या, तरी दु:ख तेच–एकटेपणाचं. मुलं आपल्याजवळ राहाणार नाहीत, तेव्हा आपण मुलांजवळ राहावं, असा जे विचार करतात त्यांनी काही तडजोडी स्वीकारण्याची मानसिक तयारी करायला हवी. वृद्धापकाळी परदेशस्थ मुलांजवळ जाऊन राहिलं, तरी तेथे भेडसावणारं एकटेपण येथे स्वदेशात राहून सोसाव्या लागणाऱ्या एकटेपणाइतकंच— किंबहुना अधिक त्रासदायक असू शकतं. आपला मुलगा वा मुलगी परदेशात आहे याचा सुरुवातीला माता-पित्यांना अभिमान असतो. तो ते मिरवतही असतात. मुलांना प्रोत्साहितही करतात, मुलंही तेथे गेल्यावर द्विधा मन:स्थितीत असतात. लेखिकेच्या भाषेत सांगायचं, तर परदेशातल्या सुविधा, आरक्षण नसणं, जीवनशैली, भ्रष्टाचारमुक्त समाज या चांगल्या बाजू असल्या, तरी तिथलं हवामान, आपल्या माणसांची सोबत नसणं, कामाला कुणाची मदत नसणं या काही नकारात्मक गोष्टीही असतात. काहीतरी मिळवायला काहीतरी गमवावं लागतं हे मान्य असलं, तरी 'मिळवणं' हे भौतिक गोष्टींशी निगडित होतंय आणि 'गमावणं' मध्ये आई-वडिलांचा, आप्तांचा सहवास, भावनिक आधार, आपला देश हे सारं येतं. तरीसुद्धा लेखिकेच्या निरीक्षणात सगळीकडे परदेशस्थ मुलांबद्दलचे वृद्ध माता-पित्यांना आलेले वाईट अनुभवच अधोरेखित केलेले आढळतात. एकाकी वृद्धापकाळातील अनेक कथा वाचकांपुढे





अनुक्रमणिका

मांडण्याबरोबरच, त्यावरील उपायांचा ऊहापोह केला असता तर तो अधिक परिणामकारक ठरला असता. वृद्धापकाळातील एकाकीपणातून' मार्ग काढून त्यावर मात करणारेही काही वृद्ध माता-पिता असतील ना? त्यांच्याही मुलाखती घेऊन वृद्धत्व सुसह्य कसे करता येईल, ज्यांनी ते केलंय, त्यांच्या मुलाखती घेऊन त्या मांडल्या असत्या, तर काही हताश वृद्धांना मार्गदर्शक ठरल्या असत्या, त्यातून जगण्याची उमेद मिळू शकते, आशादायक विचार सुरू होऊ शकतात. म्हणूनच वृद्धापकाळातील एकाकीपणासंबंधीचे भावनिक व मानसिक नियोजन करणे कसे जरुरीचे आहे यासंबंधी दिशा दाखवणे अधिक जरुरीचे वाटते. कोणत्याही व्याधीची लक्षणे, शरीरावर त्यांचे होणारे दुष्परिणाम यासंबंधीच्या चर्चेपेक्षा व्याधीतून बाहेर पडण्यासाठी कोणते उपाय योजायचे याचे मार्गदर्शन अधिक गरजेचे नाही का? एकाकीपणाचे वास्तव स्वीकारणे अवघड असले, तरी त्यावर विजय मिळवणे अशक्य नसते.

'मित्र' या नाटकात एक वाक्य आहे, 'म्हातारी माणसं मरणाला भीत नाहीत, जगण्याला घाबरतात.'

◇◇◇

**'आम्ही मायदेशी, मुलं दूरदेशी'**
ले. नीलिमा बोरवणकर,
मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस,
ठाणे (प) जुलै २०११

टिपणी लेखन - **प्रमिला राऊत,**
२६, सिव्हिल लाइन्स,
सोलापूर, ४१३००३
भ्रमणभाष : ९४२३५३५५०२

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

१) कोळकर रोहिणी किरण
२) निकम नामदेव द्वादाराव
३) चव्हाण विलास सुकलाल, पुणे
४) शिदोरे अनिल वामन, पुणे
५) इंदलकर अशोक घर्माजी, पुणे
६) वाळिंबे अमृता गिरीश, पुणे
७) म्हातारमारे सुकृत संजय, पुणे
८) जोगळेकर मंदार मोरेश्वर, पुणे
९) विदरकोटे विश्वनाथ, सोलापूर
१०) अघोरे वैशाली अनिल, सोलापूर
११) शिंदे प्रणिती सुशीलकुमार, सोलापूर
१२) जौधरी शैलेंद्र विश्वासराव, सोलापूर
१३) काळे अरुंधती माधव, घोडेगाव
१४) काळे माधव नारायण, घोडेगाव
१५) नितनवरे अनिल सेवकराम, भंडारा
१६) मुनघाटे प्रमोद गोविंदराव, नागपूर
१७) अम्वाडे वसंत बाळकृष्ण, पुणे
१८) हिंगोणेकर शशिकांत, जळगाव
१९) साळुंखे हेमंतकुमार, जळगाव
२०) प्रवर्तक म.सा.प. शाखा, जामखेड
२१) गुंजाळ अनिल दशरथ, पुणे
२२) बोरकर श्रीराम कृष्णाजी, ठाणे
२३) गानू श्वेता शंभुनाथ, ठाणे
२४) बापट गिरीश हार, ठाणे
२५) नाईक अमरनाथ रघुनाथ,
२६) पुरंदरे चंद्रकांत, इचलकरंजी
२७) यादव वसंतराव आकाराम, पुणे
२८) तुपे केशव परभतरा, औरंगाबाद
२९) वारजे माळवाडी उपशाखा – पुणे
३०) वारजे माळवाडी उपशाखा
३१) दांडेकर वि. ज.
३२) पाठक प्र. .ल.
३३) कर्दळे वसुधा
३४) छांबरे गिरीश निलकंठ
३५) ताम्हणकर मंजिरी
३६) करंदीकर गिरीश जो
३७) नेने जयंत
३८) परब प्रदीप भास्कर
३९) गायधनी वैभव मुकुंद
४०) पंडित व्ही. व्ही.
४१) निलेकर मनिषा अनिल
४२) पाठक प्रतिमा प्रकाश
४३) भिडे विजया
४४) कुलकर्णी श्रीकर जनार्दन
४५) आचार्य नारायण रघुनाथ
४६) राव मीना
४७) कुलकर्णी वैशाली
४८) जुनेजा वर्षा
४९) गरगटे संजय
५०) पंडित अविनाश
५१) पाटणकर देवदत्त
५२) पाटणकर जयंत
५३) आटवले रोहिणी
५४) सावरगांवकर किरण
५५) नारळकर विवेक
५६) घारपुरे ज्योती
५७) मुळे प्रवीण दत्तात्रय
५८) धर्मश्री शशिकांत माधव
५९) वनसोडे माधुरी वि.
६०) देशमुख अनुरेखा
६१) सातारकर नंदिनी मधुकर
६२) फणसळकर श्रीराम विनायक
६३) सोनवणे सावळेराम पांडुरंग
६४) पुरोहित नंदुकमार आर
६५) तवले म[illegible]कर नरहर
६६) धुमाळ प्र[illegible]प रामचंद्र

## निवडक नवे

– उद्धव कानडे

*महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर*

### (१) सदरा बदललेली माणसं

कवी, लेखक आणि पत्रकार मनोहर सोनवणे यांचं हे दहा ललितबंधाचं पुस्तक नुकतंच प्रकाशित झालं आहे. यापूर्वी त्यांचा कवितासंग्रह "एक शहर सुनसान' लोकप्रिय झालेला आहे. अतिशय समृद्ध असं सामाजिक चिंतन त्यांच्या कवितेतून अनुभवता आलं. त्याच व्यापक चिंतनातून त्यांचं 'सदरा बदललेली माणसं' हे पुस्तक वाचकांसमोर त्यांनी ठेवलं आहे. कुशाग्र बुद्धिमत्ता, प्रचंड वाचन, अभ्यास आणि चिंतन यातून सोनवणे यांची प्रतिभा प्रगल्भ झालेली आहे. कविवर्य वसंत आबाजी डहाके सरांची या पुस्तकाला लाभलेली सर्वांगसुंदर प्रस्तावनाच या ग्रंथाचं वेगळेपण वाचकांसमोर आणते.




अंगातला सदरा बदलावा तसा आपला भोवताल बदलत आहे. नवी भाषा, नवी तंत्रं, नवे व्यवहार असा नवलाईचा पसारा सगळीकडे पसरत चाललाय. बदलांच्या भयावह चक्रात अडकलेला माणूस हेच लेखकाच्या विचारांचं केंद्र आहे.

*(लेखक : मनोहर सोनवणे, प्रकाशक - समकालीन प्रकाशन, पुणे, पाने - १२८, मूल्य - १२५ रु.).*

### (२) माझ्या वर्तमानाची नोंद

स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड येथे प्राध्यापक असलेले डॉ. पी. विठ्ठल यांचा वर्तमानाच्या समृद्ध जाणिवा असलेल्या ह्या कसदार कवितासंग्रहाला श्री. प्रभाकर बागले यांची विस्तृत प्रस्तावना लाभली आहे. डॉ. पी. विठ्ठल यांची कविता भोवतालच्या अंधारावर आणि अन्यायावर प्रहार करते. प्रहार करताना संयमाच्या बळावर कोणाचा तिरस्कारही करीत नाही. 'दु:खाचं महावस्त्र' ही कविता सहज सापडणारी नाही. जीवनाचा तळ शोधल्यावर अशी कविता जन्माला येते. हे दु:ख फक्त कवीचं उरत नाही, तर ते उपेक्षितांचं दु:ख बनून कवितेत आलं आहे. दलितांच्या वेदनांचं दर्शन यातून घडतं. माणूसपण काळवंडून जाणाऱ्या वर्तमानाची ही मोठी नोंद आहे.




*(कवी : डॉ. पी. विठ्ठल, प्रकाशक - गोदा प्रकाशन, औरंगाबाद, पाने - १२८, मूल्य - १२० रुपये).*

### (३) संभ्रमित वर्तमान

मु. पो. यशवंतनगर-अकलूज ता. माळशिरस, जि. सोलापूर हे प्रेमनाथ रामदासी यांचं गाव. मोठ्या शहरांपासून दूर असणारा हा संवेदनशील कवी कठोर वर्तमानाच्या विषारी अनुभवाने अंत:करणातून ताकदीने पाझरतो. हृदयाचं पाझरणं अचूकपणे शब्दांत मांडतो. वर्तमानकाळात घडणाऱ्या विपरीत घटनांचं आत्मसंवादी चिंतन मांडतो. कवी प्रेमनाथ रामदासी यांनी निसर्गकविता, प्रेमकविता आणि वर्तमान वास्तवाची



अनुक्रमणिका




कविता असे अनुक्रमे ऋतुसंवाद, तुझ्यात रेंगाळताना आणि संभ्रमित वर्तमान असे तीनही भाग एकत्र करायला नको होते. निसर्गकविता आणि प्रेमकविता स्वतंत्र हवी होती.

*(कवी : प्रेमनाथ रामदासी, प्रकाशक - सुविद्या प्रकाशन, सोलापूर, पाने - ७६, मूल्य - २०).*

◇◇◇

**उद्धव कानडे**
६८६/२अ+२ब, ब्लॉक नं. १५,
ज्ञानगंगा, गृहरचना संस्था मर्या. बिबवेवाडी,
पुणे - ४११०३७, मो. ९८९०६५२७२३.

## 'माप ओलांडल्यानंतरचे' समुपदेशन – डॉ. ज्योत्स्ना आफळे

'माप ओलांडणे' हा प्रत्येक स्त्रीच्या आयुष्यातला एक महत्त्वाचा प्रसंग आहे. माप ओलांडून ती कायमची एका घरातून दुसऱ्या घरात प्रवेश करते. पित्याचे घर सोडून पतीच्या घरात जाते. येथे 'प' वरची वेलांटी 'त' वर जाते. ही इकडून तिकडे गेलेली वेलांटी मुलीचे आयुष्यच बदलून टाकते. नुसते मुलीच्या आयुष्यातच बदल घडत नाहीत तर तिच्या माहेरच्या आणि सासरच्या लोकांच्या आयुष्यातही बदल घडतात. हे बदल कसे घडतात, त्यांना सामोरे कसे जायचे असते हे आशयसूत्र घेऊन प्रत्येक कथा– कविता मेहेंदळे यांनी लिहिली आहे.




प्रत्येक कथेमध्ये मुलीला दाखवणं, पत्रिका बघणं, ती जुळणं काही ठिकाणी प्रेमविवाह– त्यांना घरच्यांची मान्यता, साखरपुडा, लग्नाची रीतसर बोलणी, साड्या, दागिने वगैरे खरेदी, मानपान, लग्नविधी, सत्यनारायण आणि हनीमून यांची वर्णने आलेली आहेत. तिथे जरा एकसुरीपणा जाणवतो; पण कुठेही दोन पक्षांमध्ये 'मानापमानाचे' नाट्य रंगलेले दिसून येत नाही. दोन्ही बाजू समजूतदार असल्याचा प्रत्यय येतो. मुलाच्या लग्नानंतर घरातील नवरा मुलगा आणि त्याचे वडील म्हणजे सासरा या दोन्ही व्यक्तिरेखा स्थिर प्रवृत्तीच्या दिसून येतात. दोघेजण सामंजस्याची भूमिका घेताना दिसतात. पण नवी सून आणि तिची सासू यांच्या अंतर्यामी थोडी चलबिचल झालेली दिसून येते.

नव्या सुनेचा विचार केला तर मुलींना माहेरच्या घरातल्या काही सवयी असतात, त्यामुळे माप ओलांडल्यावर लगेचच त्या सवयींना मुरड घालणे जड जाते. मुलींच्या माहेरचे वळण चांगलेच असते पण सासरचे वळण अंगवळणी पडायला वेळ लागतो. मुलींच्या नवरा या नात्याकडून जरा जास्त अपेक्षा असतात. क्षुल्लक गोष्टींवरून मनात संशय निर्माण होतो आणि कायमची अढी मनात धरली जाते. सासरच्या घरातील प्रत्येकाचे नातेबंध वेगळे असतात. नव्या सुनेला ते समजत नाहीत. कोण काय बोलतं, कशा पद्धतीने बोलतं याचा अंदाज यायला वेळ लागतो. कधी वेगळेच ठोकताळे बांधले जातात आणि ते कदाचित चुकीचे असू शकतात. कधी मुलीच्या माहेरचे लोक मुलींच्या संसारात जास्त हस्तक्षेप करतात. या सगळ्यांमुळे जो ताण येतो तो कसा नाहीसा करायचा हे लेखिकेने कथेतील पात्रांच्या माध्यमातून सांगितले आहे.

◇◇◇

**डॉ. ज्योत्स्ना आफळे**



अनुक्रमणिका



पुस्तक-परीक्षण

# 'या शतकाचा सात-बारा- होईल कोरा'

– डॉ. कैलास सार्वेकर

शंकरराव दिघे यांची **'या शतकाचा सात-बारा- होईल कोरा.......'** ही ७३ पानांची दीर्घकविता आहे.

'सात-बारा' हा कृषिजीवनातील महत्त्वाचा ऐवज. या कागदावर साऱ्या शेतीची अद्ययावत कुंडली असते. पीकपेरे, वंशावळ, मालकीहक्क, कर्ज, त्यामुळे येणारे घेरे वगैरे. यात महत्त्वाचे असतात, ते मालकी हक्क. या सर्वांच्या नोंदी म्हणजे त्या त्या शेताचा 'अपडेट बायोडाटा.' कवितेतला हा बायोडाटा केवळ शेताचा नाही तर देशाचा आहे. आजचा नाही तर पुऱ्या शतकाचा आहे. जवळपास कमीअधिक एका शतकापासून या देशाच्या सर्व क्षेत्रांवर राजकारण्यांचा वरचष्मा आहे. स्वातंत्र्योत्तर काळात तर अधिकच! म्हणून केशवसुतांच्या अर्थपूर्ण उक्तीच्या धाटणीत आपली मगरुरी ही राजकारणी मंडळी, 'आम्हाला वगळा । या शतकाचा सात बाराच । होऊन जाईल कोरा ।' (पृ. ६१) या उपरोधिक शब्दांत व्यक्त करतात.

विष्णूने अवतारं घेण्याची कल्पना मध्यवर्ती आहे. अवतार घेण्याची अनिवार्यता निर्माण होण्याअगोदर या पृथ्वीवरील अराजकता पाहण्यासाठी नारदासह पृथ्वीवर येण्याचा श्रीविष्णूंचा बेत पक्का होतो. गावोगावच्या स्मशानांत असंख्य प्रेतं जळताना त्यांना दिसतात. तिथं आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांचं जागरण सुरू असतं. (पृ.३४ ते ३९) हे जागरणच या कथेचा गाभा म्हणता येईल. कथानकभर घडणाऱ्या घटितांचं प्रयोजन व फल या आत्महत्यांमध्ये दडलं आहे. अवतार घेण्याऐवजी 'सोशल इंजिनियरींगचा' संदेश अर्क पुढाऱ्याला सांगितला जातो. त्यानेच तो तडकतो; आणि आपली महती त्याच्या तोंडून श्रीविष्णूला ऐकवतो. त्याच्या करणीचे किस्से पुन:पुन्हा हादरे देत जातात. ते ऐकवताना विष्णूलाच उलट सल्ला मिळतो. त्याची 'मनोगीता' तो देवाला ऐकवतो. श्रीविष्णू आणि नारद पृथ्वीवरून काढता पाय घेतात. 'अर्काचं' परमेश्वररूप सिद्ध होऊन त्याचा सत्कार होतो. स्वर्गात देवसभा भरते. अवताराची कल्पना 'मॉडीफाय' करत 'एकाने जन्म घेऊन सारे जग सुधारते' या कल्पनेतून स्वर्गाला मुक्त व्हावे लागेल....! या निर्णयाप्रत ते येतात.

कथानक केवळ निमित्तमात्र आहे. राजकारण, समाजकारण, शिक्षण, विषमता, भ्रष्टाचार, शोषण, दांभिकता अशा अनेक गोष्टी सूत्रबद्धपणे सांगण्यासाठी या कथानकाचा आधार कवी घेतो. आपल्या विशिष्ट शैलीत तो या साऱ्या गोष्टींवर प्रकाश टाकतो. ही शैली जशी झोंबणारी तशी विचारप्रवृत्त करणारीही आहे. उदा. जागरणातले शेतकरी–

*'शेतं गुंतली, ढोरं खपली, विकलं आखर वखर'*
(जाखाईपासून खंडोबापर्यंत)
*'सर्वांनीच आम्हाला टाकलं, सावकारानं घेरलं*
*सरकारनं नाडलं....आता शेवट बघायला या...*
*आत्महत्या करतो आम्ही...*
*साक्षीला तरी या' ।।ध्रु.।। (पृ.३५)*

अशा शेतकऱ्यांची सावकार–शासनाकडून होणारी संकटांची मालिका. त्यांची आत्महत्त्येत होणारी परिणती! या आत्महत्त्येप्रसंगी केलेलं आवाहन जागरणाच्या फॉर्ममध्ये लयबद्ध रीतीने प्रभावी होतं.

जागरणाच्या पुढील तुकड्यात अनुक्रमे मीडिया, फेस्टिव्हल, साहित्यिक, तथाकथित शास्त्रज्ञ, विचारवंत–



अनुक्रमणिका

त्यांचे परिसंवाद, नरेंद्र जाधव विरुद्ध पी. साईनाथ यांच्या संदर्भातला वाद, विविध जाति-धर्म, प्रति-पुरोगामी, बी.सी.-ओ.बी.सी., हिंदुत्ववादी व इतर वादी या सर्वांना आवाहन केलं जातं:

*'शेतकरी म्हणून जन्मलो, वाढलो, मेलो*
*मुर्दांना आपले लेबल लावायला या' (पृ. ३७)*

शेतकऱ्यांच्या आत्महत्यांच्या जागरणानंतर लोकशाहीतल्या या अर्कांची (अर्क-पुढारी) मनोगीता पुढे सुरूच राहाते. दुसऱ्याच्या खोपात अंडी उववणाऱ्या कावळ्याप्रमाणे यांनी सत्तेचा वेल विस्तारात नेणे. या वृत्तीचे सूचन करणारे या पुस्तकाचे मुखपृष्ठ आहे, गोगलगाय! 'गोगलगाय अन् पोटात पाय.' तिच्या पोटातून राजकारण्यांचा क्रूर पंजा बाहेर आलेला. या पंजाने गोगलगाय पुढे जाताना, मागे द्रव सोडून, आपली वाट ठळक करते, त्याप्रमाणे या नगांनी संपूर्ण शतकाचा सात-बाराच व्यापून टाकला. इतका की, स्वत:च या भूलोकीवरच्या देवांची जागा घेतो. हे सारं घडतं ते स्वप्नात! स्वप्नातली घटना माहितीच्या अधिकारात येत नाही हा 'अर्कांचा' भ्रम. मात्र नारद हिडन कॅमेरा शेंडीत अडकवून या घटनेचं स्टिंग ऑपरेशन करतो. तिथूनच इंद्रदरबारी या संवादाचं 'लाइव्ह टेलिकास्ट' करतो.

यानंतर एकाने परिवर्तन करण्याऐवजी गणांनी (सामान्य जनतेने) परिवर्तन करण्याची कवीची अपेक्षा हा या कवितेचा शेवटचा आणि सर्वात महत्त्वाचा भाग आहे. लोकशाही आता काहींच्या दरबारात नाचणारी अप्सरा झाली. सगळं बदललं पण जातिव्यवस्था नाही बदलली. या सर्वांत परिवर्तन करण्यासाठी–

*.....गणांनी भणंग व्हावे....*
*उद्ध्वस्त करण्या हे जलमांचे इमले*
*गावोगाव सुरुंग पेरावे (पृ. ६९)*

'गणांना मिळो पृथ्वीवर यश' ही देवाच्या तोंडून केलेली अपेक्षा हेच या कवितेतलं पसायदान आहे.

◇◇◇

**डॉ. कैलास सार्वेकर**
प्रपाठक
तौलनिक भाषा व वाङ्मय विभाग
उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
भ्रमणध्वनी : ९४२१५६८९५९

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

६७) खोले शामराव दत्तात्रय
६८) गोखले अरुणा प्रकाश
६९) अराणके गजानन गोपाळ
७०) पांडकर भालचंद्र विष्णू
७१) कुलकर्णी गोपाल माधव
७२) मर्ढेकर वसंत पुरुषोत्तम
७३) काणेगावकर धनश्री सुधीर
७४) जोशी दिगंबर कालिदास
७५) धर्माधिकारी चंद्रशेखर दत्तात्रय
७६) अद्वैत वृंदा दिवाण
७७) शहा अशोक राजाराम
७८) वैद्य माधवी
७९) वैद्य दिलीप
८०) पत्की हेमकिरण दत्तात्रय, सोलापूर
८१) लोणी धारेप्पा यमनप्पा, सोलापूर
८२) नाझर प्रसन्न महेश, सोलापूर
८३) कुलकर्णी गोविंद गोपाळ, सोलापूर
८४) पाटील रजनी विश्राम, जळगाव
८५) भैराळे ललिता अभिमान, जळगाव
८६) शिंदे दिलीप अधिकराव, सांगली
८७) निरगुडे सुरेंद्र, पुणे
८८) भाऊ गोखले, .
८९) फडणीस रंजना उदय
९०) देसाई विद्या
९१) कर्वे अनुराधा
९२) निमळे सुभाषचंद्र
९३) पेंडसे सुभाष
९४) वोरकर विद्याधर
९५) व्यास अलका
९६) पानगव्हाणे हर्षल. वसंतराव
९७) पानगव्हाणे सविता हर्षल
९८) आहेर यशवंत भाऊसाहेब
९९) टंकसाळे महेश रामचंद्र
१००) वि गि प्रसन्न अनंतराव
१०१) कोकाटे रमेश दत्तात्रय, डोंबिवली
१०२) वेलसरे चंद्रकांत प्रमोदकुमार, पुणे
१०३) जोशी सुधीर सुधाकर, शिराळा
१०४) मखरे हेमांगी भारत, शिराळा
१०५) सरदेसाई सुप्रिया पांडुरंग, शिराळा
१०६) रोकडे संदीप दत्तात्रय, शिराळा
१०७) पाटील हणमंतराव, शिराळा
१०८) काकडे प्रदीप वसंतराव, शिराळा
१०९) हजेरी कुणाल मदन, पुणे
११०) कदम सुजित शिवाजी, पुणे
१११) लाटकर मानसी विजय, वारजे
११२) हर्षे उज्ज्वला, वारजे
११३) कुलकर्णी मृदुला, वारजे
११४) जोशी तेजस्विनी रमेश, पुणे

पुस्तक-परीक्षण

# 'तळ ढवळताना!'

– डॉ. सतीश बडवे

क्रांतिपर्व, टाचाटिभा या बहुचर्चित काव्यसंग्रहांनंतरचे लहू कानडे यांचे दमदार पाऊल 'तळ ढवळताना...'मध्ये पडले आहे. एका अर्थाने परिपक्व आणि प्रगल्भ जीवनजाणिवांची नोंद करणाऱ्या त्यांच्या या काव्यसंग्रहाने दलित कवितेला एका वेगळ्या उंचीवर नेऊन ठेवले आहे. 'क्रांतिपर्व'मधील लहू कानडे यांची शब्दकला अतिशय भेदक, व्यवस्थेवर प्रहार करणारी आणि शोषण करणाऱ्या शोषकांना घाम फोडायला लावणारी होती. ते अंगारतेज 'टाचाटिभा'मध्ये कमी होत गेले. पण मूळ उद्दिष्ट न बदलता आपल्या कवितेची जातकुळी वेगळी कशी ठरते याचा प्रत्यय 'टाचाटिभा'ने दिला. बंडखोर जेव्हा प्रस्थापित होतात तेव्हा अनेकांचा जोश उतरणीला लागतो. लहू कानडे यांच्याबाबत तसे घडले नाही. उलट त्यांचा प्रवास परिपक्वतेच्या दिशेने सुरू झाला. प्रारंभी प्राध्यापकी, नंतर ग्रामविकासाच्या कामात सरकारी नोकरी, तिथे उच्चपदावर काम करण्याची मिळालेली संधी, त्यानिमित्त महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागात काम करण्याचा घेतलेला अनुभव या गोष्टी मध्यंतरीच्या पंधरा-वीस वर्षांत घडल्या. माणसात रमणाऱ्या, शोषितांच्या दु:खाची नाळ जोडणाऱ्या या कवीने माणसे वाचली. भोवतालच्या बदलत्या परिस्थितीचा रेटा अनुभवला. जगण्याविषयीचे चिंतन केले. सामान्य माणसाच्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी प्रत्यक्ष मैदानात उडी टाकली. संकुचित अस्मितांना बाजूला सारत मूळ प्रश्नांचा वेध घेतला.



या कवितेचा प्रारंभच नव्या सहस्रकाच्या स्वागताने होतो. त्याचं स्वागत कोणत्या पद्धतीने करायचं? असा पेच कानडेंसमोर आहे.

*कालच्या शतकानं तर घेतला*
*दऱ्याखोऱ्यांतून वाहणाऱ्या गाण्याचा घोट*
*मूठभरांच्या भल्यासाठी बेवारस केलं*
*कंदमुळ्यांवर जगणारं पोट*
*ठेवू काय त्याच्या हातावर*
*असंख्य धरणातून साठलेलं मातीचं लोणी*
*की विस्थापित झालेल्या आदिवासींच्या डोळ्यातलं*
*पाणी?*
*नवं सहस्रक दारात आलंय*
*त्याच्या हातावर काय ठेवू?*

आदिवासींच्या जगण्याचा एक संदर्भ इथे सुरू होतो आणि तो तिथंच थांबत नाही. या सहस्रकाबरोबर येणारी कुरूपता या कवितेतून गोचर होते. सामुहिकदृष्ट्या, लेकींचे गर्भाशयातील खून, सुंदरतेच्या नावाखाली चाललेला देहविक्रय, मनूच्या वारसदारांचे नवे मुखवटे, मल्टीमिडिया, सॅटेलाईटस्चं गाजर, दुबळ्यांचं नाकारलं जाणारं माणूसपण, हायटेक होणारं जगणं अशा गुंतवळीमधून छिन्न-विछिन्न होणारं जगणं! हे नव्या सहस्रकाचं वास्तव कवीला अस्वस्थ करतं. या पहिल्या कवितेपासूनच तळ ढवळण्याची प्रक्रिया सुरू होते. कवीच्या आयुष्याचा एक भाग भोगवट्याचा, शोषणाचा आहे. एक भाग संघर्षाचा, परिवर्तनवादी विचार पचवून समाजात रुजवण्याचा आहे, एक भाग संपन्न जीवन जगत असताना तळातल्या शोषितांना वर खेचण्याचा



अनुक्रमणिका

आहे. परिणामी त्याचे अनेक कंगोरे आहेत. या कंगोऱ्यांमधून ही कविता उलगडत जाते. कधी ती आदिवासी आणि त्यांच्या पहाडांविषयी बोलता बोलता तिथले दारूण दु:ख उकलत जाते, तर कधी ग्रामस्वच्छतेच्या दिशेने हागंदारीमुक्त गावाची स्वप्ने रंगवते. कधी या कवितेला समुद्राच्या गावातील अनुभवाचा खोलवर आशय शोधावासा वाटतो, तर कधी शासकीय कार्यालयातील फाईल्समधून अनाथ माणसांची गहिरी दु:ख ती सामोरी आणते. एकटेपणा आणि तुटलेपणातून सुरू झालेला हा आत्मशोध आता संवादी झाला आहे. आशयगर्भ कवितेच्या मांडणीतून प्रकटणारा लहू कानडे यांचा अंत:स्वर आता दीर्घ चिंतनाच्या मुशीत ढवळून निघाल्यामुळे परिपक्व बनला आहे. सातपुडा चितारताना हे प्रकर्षाने जाणवते. कानडे यांच्या अभिव्यक्तीचे हे वेगळेपण पहिल्या भागातून सहज डोकावते.

*सातपुडा*
*चिवचिंवणाऱ्या आकाशलक्षी रंगीत पंखांचा निवारा*
*झाडाझुडपांतून सळसळणारा जिवंत जंगल वारा*
*निरागस उघड्यानागड्या मूळ निवासींचा सहारा*
*महूच्या फुलांनी बेधुंद झालेला हिरवांकच पसारा,*

पण अलगदपणे टपाल फोलिओतून प्रकटणाऱ्या तक्रारी नोंदवून या सौंदर्याच्या आड लपलेल्या कुरुपतेचेही दर्शन घडवतात.

*कुण्या पाड्यावरील शाळा*
*म्हैनाभरापासून उघडलीच नाय*
*अंगणवाडीचा पोषणआहार चोरीला गेलाय*
*अन् पंचायतीला टाळं ठोकून भावसायव पसार झालाय*
*राकेल नाय, धान नाय हे तर हायेच पर*
*पहिल्याच पावसात बंधारा वाहून गेलाय एका घरासकट*

सातपुड्याच्या साती पुडांमधून अशा कितीतरी गोष्टी ही कविता सांगत जाते. त्यात बालमृत्यू असतो, बदलीचे आदेश असतात, कुण्या अधिकाऱ्याच्या वासनेला बळी पडलेली एखादी 'रानवेल' असते, उपऱ्या मूठभरांचा हा आदिवासी गुलाम असतो. त्याला दऱ्या-खोऱ्यांतून बाहेर येण्याचे, आश्रमशाळेच्या बोधीवृक्षाखाली बसण्याचे, न घाबरता संघटित होण्याचे, संविधान नावाची संजीवनी सोबत घेण्याचे आणि प्रश्न विचारण्याचे आवाहन कवीला करावेसे वाटते. ही सहसंवेदना या कवितेची ताकद आहे. म्हणूनच या कवितेतून एखादा बहारू, एखादी माता मेधा, एखादी प्रतिभा सहज भेटते. त्यांच्या असण्याच्या सूचनातून आशेचा किरण दिसतो. दलित जाणीवेचे हे विस्तारलेले वर्तुळ वाचकालाही खिळवून ठेवते.

या काव्यसंग्रहाचा दुसरा भाग 'हागंदरीमुक्त गाव' या संकल्पनेशी बांधलेला आहे. या प्रयोगाचे श्रेयही लहू कानडे यांचेच. ग्रामस्वच्छतेची ही दिशा त्यांनी आपलीशी केली. हा स्वच्छतेचा संदेश महात्मा गांधी आणि डॉ. आंबेडकर या दोघांनीही दिला होता. एकाच युगाच्या या दोन्ही महानायकांच्या भूमिकांमधील परस्परविरोध आणि तरीही स्वच्छतेशी संबंधित असणाऱ्या दोन्ही महानायकांच्या कल्पना त्यातून पुढे येतात. वडगाव आमलीच्या तुळसामावशीची प्रतिक्रिया ग्रामनिर्मळतेच्या संकल्पनेला एका अनोख्या टप्प्यावर आणून उभी करते: ग्रामजीवनाच्या परिवर्तनाचा हा वेगळा जिताजागता पुरावा आहे. कवीचा आणि तुळसामावशीचा संवाद याची साक्ष ठरेल. देहाचा सांस्कृतिक बाजार, टॅलेण्ट स्पर्धातून खेळला जाणारा नफ्याचा जुगार – हा सारा मस्तवालपणा बघून हा एडस्‌पेक्षा भयंकर आजार असल्याची जाणीव कवितेतून उजागर केली जाते. यात सुखाचं न्याय्यवाटप येणार कुठून? कोणती नवी आशा त्यातून सापडणार? कोणता प्रहर अनुभवतोय आपण? असे प्रश्नही कविता निर्माण करते. इथल्या ग्रामजीवनालाही या साऱ्या गोष्टींचे आकर्षण आहे. याला विरोध करण्याची ताकद 'ग्रामसभा' दाखवू शकते, यावर कवीचा










अनुक्रमणिका

विश्वास आहे.

उजाडल्यानंतरच्या साठेक वर्षानंतरचे तळातले वास्तव बदलत गेले. ज्या तळातून कवी वर आला, त्याचाच भवताल बदलला. समुद्र असलेल्या गावातला त्याचा अनुभव पुन्हा वेगळा झाला. कधी त्याच्या संवेदनविश्वाला तडे गेले, कधी नफ्या-तोट्यात तो भेलकांडत राहिला, तिथला राडा, गोंगाट, अथांग झोपडपट्टी आणि अंधाराचा महापूर बघून तो तळ शोधू-चाचपडू लागला...

*शेवटी कावलो चाचपून पाहिलं स्वत:लाच*
*तर चक्क समोर तरळून आला भूतकाळ*
*आणि सक्त ताकीद दिली सर्वांना*
*आजपासून उद्योगाऐवजी माणसाबद्दल बोलायची*

साहजिकच बरोबरच्यांमध्ये तो अडाणी ठरला. नव्वदोत्तरी जगण्याचे एक वेडंविद्रूप रूप समुद्र असलेल्या गावातही कवीनं अनुभवलं आहे.

*मी चाचपडतोय तळ*
*निद्रिस्त ज्वालामुखीसारखा शांत*
*ढवळूच नये वाटतं हे आग्यामाश्यांचं मोहोळ*
*त्सुनामीच्या या सुपीक प्रदेशाला माहित्येय काय*
*मंथनातून उसळणारं जालीम हलाहल?*

समुद्र असलेल्या गावाची ही भिन्न भिन्न रूपं पूर्णपणे अनोखी आहेत. देशाच्या आर्थिक राजधानीतल्या या अंधारवाटांना कवीनं प्रकाशमान केलं आहे. बदलत्या जागतिकीकरणाच्या संदर्भासह माणसांचे जगणे केंद्रस्थानी आणणारी ही कविता इथल्या भयाण वास्तवाला मूर्त करते. गावकुसाबाहेरची वस्ती इथे गोळा झाल्याचे कवीने टिपून ठेवले आहे. त्यांच्या कष्टावरच तर हा समुद्र असलेला गाव धनाढ्य बनतोय.

*तळ कोणीच नाही ढवळला*
*शहाणपणाचा अंकुर नाही रुजू दिला*
*बुद्धिवंतांनी घेतली कवाडं लावून*
*गाईली भजनं अखंड देवाचं सोंग घेऊन*
*कुंपणासारखं वापरलं गावकुसाबाहेरील बाभूळबोरींना*
*भोगलं देवदाशा करून कोवळ्या पोरींना.*

हे तळातल्या माणसांचं विद्रूप जगणं होतं. जातीचे तुरुंग बांधण्यासाठी अहोरात्र खपणारे ज्ञानी लोक स्वार्थी होते. सामंतशाहीच्या धाकापुढे लीन होत बोरूबहाद्दरांनी झिजवलेल्या लेखण्या तळातल्या माणसांची दु:खे चितारणाऱ्या नव्हत्या. अशावेळी सत्यधर्म सांगणारे ज्योतीबा आणि अमानुषतेचा बोभाटा शतपत्रांतून उमटवणारे लोकहितवादी आले. पण त्याही अगोदर सर्वप्रथम हा तळ ढवळला तो तथागत गौतमबुद्धाने. म्हणूनच त्याच्याविषयीची कृतज्ञता या कवितेतून पुढे येते.

*पहिला तूच आहेस बापा*
*ज्यानं ढवळला समग्र तळ*
*आणि उचंबळून आलं*
*पिढ्यान्‌पिढ्यांचे साचलेले गदळ*

अस्पृश्यतेचा मळ साफ करायला सांगणाऱ्या तथागताने प्रज्ञा-करुणा-शीलाचं आभाळ या तळावर पांघरलं. या त्रि-सूत्रीनं अंधारवाटांना प्रकाश दिसला, रस्त्यावरचे खाचखळगे दिसले. तळातल्या लोकांना निर्मळतेची वाट दाखवली. म्हणूनच समतेच्या नव्या संस्कृतीच्या बांधकामाला आरंभ झाला, याची दखल ही कविता घेते. हा तळ नुसता ढवळला गेला नाही, तर त्यातून बळही पेरलं गेलं.

कानडे यांचे नाते या उदारमतवादी परंपरेशी आहे. तळ ढवळण्याचे स्वप्न पाहणारे आज हयात नाहीत; पण त्यांच्या विचारांचे वेष्टन लाभलेल्या लढाईला मात्र बळ मिळाले आहे, हेच इथे सूचित होते.

◇◇◇

**डॉ. सतीश बडवे**
मराठी भाषा व वाङ्मयविभाग
डॉ. आं. म. विद्यापीठ, औरंगाबाद
भ्रमणभाषा : ९१५८९९७७९७



अनुक्रमणिका



**(१) बहुश्रुत**

कवि विद्याधर दांडेकर ह्यांनी संस्कृतमधील सुभाषितांचे समश्लोकी भाषांतर केले; आणि त्यांचा सुबोध अर्थही दिला आहे. प्रा. वाग्वैद्य मो. गो. धडफले यांची 'सुभाषित सौहार्द' ही प्रस्तावनाही वाचनीय आहे. विद्यार्थी आणि अभ्यासकांना हे पुस्तक उपयुक्त आहे. (पुष्पक प्रकाशन, पुणे, पृष्ठे २००, किंमत रु. १५०/-, मे २०११)

**(२) अनोखी भेट**



श्री. मुरलीधर उत्तरवार ह्यांचे हे पुस्तक म्हणजे कथा, मुक्तचिंतन आणि आत्मनिवेदन ह्यांचा त्रिवेणी संगम आहे. जीवनातील विविधांगी लेखाची ही अनोखी भेट आहे. (पुष्पक प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४४, किंमत रु. १५०/-, एप्रिल २०१२)



**(३) अविस्मरणीय प्रवास**

सौ. वैशाली पांढरी पांडे ह्यांचे हे प्रवासवर्णन– मिलान, रोम आणि पॅरिसच्या इतिहास, भूगोल आणि लोकसंस्कृतीचे दर्शन आहे. प्रवासवर्णनात जागोजागी आलेले आत्मप्रकटीकरण तितकेच लक्षणीय आहे. (पुष्पक प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३६, किंमत रु. १५०/-, मार्च २०१२)

**(४) समर्थांचे शिक्षणशास्त्र**



प्रा. उज्ज्वला प्रकाश दीक्षित यांचे हे पुस्तक लोकशिक्षक समर्थ रामदासस्वामींच्या साक्षेपी लेखनातील समाजशिक्षणाचे दर्शन घडविणारे आहे. मूल्यसंवर्धन, सौंदर्यसंवर्धन, साक्षेप, अंधश्रद्धा निर्मूलन, ध्येयनिष्ठा, इत्यादी विचार कालबाह्य झालेले नाहीत. विद्यार्थी आणि शिक्षकांना हे उपयुक्त आहे. (स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७६)



**(५) नादब्रह्माचे वारकरी**

विठ्ठलराय भट संगीतोपासना करणारे संगीताचे मानकरी यांच्या साधनेचे संक्षेपाने दर्शन घडविले आहे. स्वरभास्कर भीमसेन जोशी, बिस्मिल्ला खान, झुबिन मेहता, लता मंगेशकर पं. रविशंकर, गानसरस्वती किशोरी आमोणकर आणि बासरीवादक हरिप्रसाद चौरसिया ह्यांचा परिचय करून देणारे हे पुस्तक विद्यार्थी आणि सामान्यवाचकांनाही उद्बोधक आहे. (मुक्तांगण प्रकाशन, पुणे, पृष्ठे ७८, कि. रु. ६०/-)

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शहर कार्यवृत्त नोंद
(१६ फेब्रुवारी २०१२ ते ३१ मे २०१२)

## — पुणे शहर —

**१) दि. १९ फेब्रुवारी २०१२ : नवं कोरं :** या उपक्रमांतर्गत मनोहर सोनवणे यांच्या 'सदरा बदललेली माणसं' या पुस्तकावर चर्चा आयोजित करण्यात आली होती. या चर्चेचे अध्यक्षपद ज्येष्ठ समीक्षक व संमेलनाध्यक्ष मा. श्री. वसंत आबाजी डहाके यांनी भूषविले. या चर्चेत दूरदर्शनचे माजी संचालक ज्येष्ठ पत्रकार व लेखक अवधूत परळकर यांनी भाग घेतला होता. परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. मनोहर सोनवणे यांनी लेखक म्हणून आपली भूमिका विशद केली. परिषदेचे कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले. अंजली कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले.

**२) दि. २१ फेब्रुवारी २०१२ : कॉन्टिनेन्टल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ :** अपर्णा पाटकर यांच्या 'स्माईल प्लीज' ह्या पुस्तकास व या पुस्तकाचे प्रकाशन करणाऱ्या शिवांजली प्रकाशनास कॉन्टिनेन्टल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक प्रदान करण्याचा समारंभ झाला. ज्येष्ठ विनोदी लेखिका सौ. मंगला गोडबोले अध्यक्षस्थानी होत्या. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. त्यांच्याच हस्ते अध्यक्ष मंगला गोडबोले यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. तसेच. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते दोन्ही परीक्षक बंडा जोशी व श्याम भुर्के यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. तसेच कोषाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते कॉन्टिनेन्टलच्या देवयानी अभ्यंकर व डॉ. वैद्य यांच्या हस्ते लेखिका अपर्णा पाटणकर यांचा पुष्पगुच्छ देऊन स्वागत सत्कार करण्यात आला. देवयानी अभ्यंकर यांनी मनोगत व्यक्त केले. परीक्षकांपैकी बंडा जोशी यांनी परीक्षकाचे मनोगत व्यक्त केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी अपर्णा पाटणकर यांचा परिचय करून दिला. यानंतर मंगला गोडबोले यांच्या हस्ते अपर्णा पाटणकर यांना कै. चिं. वि. जोशी पारितोषिक प्रदान करण्यात आले. त्याचवेळी शिवांजली प्रकाशनाचे श्री. लोणकर यांनी प्रकाशकाचे पारितोषिक स्वीकारले. अपर्णा पाटणकर व प्रकाशक श्री. लोणकर यांनी मनोगत व्यक्त केले. नंतर मंगला गोडबोले यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले व कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले.

**३) दि. २६ फेब्रुवारी २०१२ : पहिले पर्यावरणप्रेमी साहित्यसंमेलन :** किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या निमित्ताने महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे आयोजित पहिले पर्यावरणप्रेमी साहित्य संमेलन बालगंधर्व रंगमंदिराच्या कलादालनात दिवसभरासाठी झाले. या संमेलनाचे अध्यक्ष प्रसिद्ध कवी श्री. ना. धों. महानोर हे होते. म.सा.प. टिळक रस्ता ते बालगंधर्व रंगमंदिर अशी 'वृक्षदिंडी' या निमित्ताने सकाळी काढण्यात आली. पुण्यातील रेणुकास्वरूप, हुजुरपागा इत्यादी शाळांतील मुलामुलींनी या दिंडीत सहभाग घेतला होता. महानोरांच्या हस्ते रोपाला पाणी घालून संमेलनाचे उद्घाटन झाले. यावेळी व्यासपीठावर अध्यक्ष महानोर, महोत्सव संयोजक विरेन्द्र चित्राव व परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य आणि प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी उपस्थित



अनुक्रमणिका

होते. चंद्रकांत वानखेडे यांनी एक निसर्ग कविता सादर केली. 'पर्यावरण, संस्कृती, समाज, शासन आणि साहित्य' या विषयावर श्री. महानोरांचे बीजभाषण झाले. त्यानंतर दुपारच्या सत्रात 'भारतीय संस्कृती आणि पर्यावरण विचार' या विषयावर डॉ. सरोजा भाटे, 'संत आणि लोकसाहित्यातील पर्यावरणविचार' या विषयावर डॉ. रामचंद्र देखणे, 'पर्यावरणविषयक बदलत्या जाणिवा आणि प्रसार माध्यमे' या विषयावर अभिजीत घोरपडे आणि आरती कुलकर्णी, 'आजची संस्कृती आणि पर्यावरण' या विषयावर डॉ. अनिल अवचट, 'पर्यावरण पूरक साहित्य आणि जीवनशैली या विषयावर डॉ. श्री. द. महाजन यांची भाषणे झाली. समारोपाच्या सत्रात 'पर्यावरणाचे राजकारण' या विषयावर श्री. अतुल देऊळगांवकर यांचे भाषण झाले. सूत्रसंचालन मृणालिनी कानिटकर जोशी यांनी केले.

**४) दि. २६ फेब्रुवारी २०१२ : कुसुमाग्रज जन्मशताब्दीनिमित्त :** 'एक किरण सूर्याचा' हा कुसुमाग्रजांच्या साहित्याचा मूल्यवेध घेणारा विविधरंगी सोहळा आयोजिला होता. महाराष्ट्र साहित्य परिषद, विवेक न्यासपीठ, गरवारे महाविद्यालय व संस्कार भारती या संस्थांच्या संयुक्त विद्यमाने यशवंतराव चव्हाण नाट्यगृहात हा कार्यक्रम झाला. संहिता, संशोधन व सूत्रसंचालन डॉ. अरुणा ढेरे यांचे होते. या कार्यक्रमास कवी 'ग्रेस' यांची विशेष उपस्थिती होती.

**५) दि. २८ फेब्रुवारी २०१२ : विज्ञानदिन :** मराठी विज्ञानपरिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने माननीय डॉ. मंगला नारळीकर यांचे 'गणिताची गरज व जरब' या विषयावर व्याख्यान झाले. यावेळी विज्ञान परिषदेचे अध्यक्ष प्रा. ह. ग. भोसले व महाराष्ट्र परिषदेच्या कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी हे उपस्थित होते. विज्ञान परिषदेचे कोषाध्यक्ष भालचंद्र अत्रे यांनी सूत्रसंचालन केले. उपस्थितांनी विचारलेल्या प्रश्नांना डॉ. नारळीकर यांनी उत्तरे दिली. संजय भामरे यांनी प्रास्ताविक केले व भालचंद्र अत्रे यांनी आभार मानले.

**६) दि. २९ फेब्रुवारी २०१२ : स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर पुण्यतिथीनिमित्त व्याख्यान :** विधिज्ञ नितीन आपटे यांचे 'सावरकर आज असते तर' या विषयावर व्याख्यान झाले. परिषदेचे कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व सूत्रसंचालन केले. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले. ह्या व्याख्यानाच्या प्रारंभी सार्वजनिक गणेशोत्सवास विधायक वळण देणारे थोर गाणपत्य तात्यासाहेब तथा प्रतापराव गोडसे यांना उपस्थितांनी एक मिनिटभर उभे राहून श्रद्धांजली अर्पण केली.

**७) दि. १० मार्च २०१२ : दिवाळी अंकस्पर्धा पारितोषिक वितरण समारंभ व ई-निरागस (ई-बुक)चे प्रकाशन :** ई-निरागस या ई-बुकचे प्रकाशन काही शाळांचे विद्यार्थी व व्यासपीठावरील मान्यवर यांच्या हस्ते झाले. प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते मोनिका गजेंद्रगडकर, धनंजय दातार परीक्षक संजय भास्कर जोशी व वंदना बोकील-कुलकर्णी, चंद्रकांत शेवाळे व मीनाक्षी केळकर यांचा सत्कार करण्यात आला. डॉ. माधवी वैद्य यांनी ई-निरागसविषयी निवेदन केले. जोशी व बोकील-कुलकर्णी यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. संतोष शिंत्रे यांनी प्रातिनिधिक स्वरूपात पारितोषिक विजेत्यांतर्फे मनोगत व्यक्त केले. सुनील महाजन यांनी आभार मानले. मोनिका गजेंद्रगडकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन महेंद्र मुंजाळ यांनी केले. (दिवाळी अंक स्पर्धेचा निकाल याच अंकात प्रसिद्ध करत आहोत.)

**८) दि. १२ मार्च :** 'स्वर्गीय यशवंतराव चव्हाण जन्मशताब्दीनिमित्त संवाद, पुणे व महाराष्ट्र साहित्य





अनुक्रमणिका

परिषदेतर्फे रत्नागिरी येथील तरुण कार्यकर्ते संतोष शिर्के यांना घरपोच ग्रंथालय चळवळीसाठी काही ग्रंथ भेट देण्यात आले. श्री. अनिल कुलकर्णी व कार्यवाह सुनिता राजे पवार यांनी हे ग्रंथ उपलब्ध केले होते. यावेळी उपस्थितांना मा. यशवंतराव चव्हाण यांच्या जीवनावरील १॥ तासांची चित्रफित दाखविण्यात आली. संवादचे सुनील महाजन निकिता मोघे, डॉ. माधवी वैद्य, प्रा. मिलिंद जोशी हे उपस्थित होते. सूत्रसंचालन उद्धव कानडे यांनी केले.

**९) दि. १५ मार्च २०१२ : परिवर्तन कविसंमेलन :** लोकशाहीर अण्णाभाऊ साठे, अध्यासन, पुणे विद्यापीठ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यस्तरीय परिवर्तन कविसंमेलन आयोजित करण्यात आले. पुणे विद्यापीठाचे उपकुलसचिव बाळासाहेब नाईक, प्रा. मिलिंद जोशी, डॉ. माधवी वैद्य, समन्वय प्रकाश घोडके, अध्यासन प्रमुख प्रा. रामनाथ चव्हाण उपस्थित होते. रमण रणदिवे, प्रदीप निफाडकर, इलाही जमादार, अनिल कांबळे, धर्मराज निमसरकर, प्रा. संतोष काळे, कल्पना दुधाळ, अंजली कुलकर्णी, लता ऐवाळे, अस्मिता जोगदंड, चंद्रकांत वानखेडे, डॉ. बाळासाहेब सोनवणे, राजन लाखे या कवींनी सहभाग घेतला. उद्धव कानडे यांनी सूत्रसंचालन केले.

**१०) दि. २० मार्च २०१२ : कवी ना. सी. मर्ढेकर स्मृतिदिन व कै. रा. श्री. जोग समीक्षा पुरस्कार वितरण समारंभ :** डॉ. न. म. जोशी अध्यक्षस्थानी होते. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. डॉ. न. म. जोशी, डॉ. चंद्रशेखर बर्वे व डॉ. कल्याणी दिवेकर यांचा प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी डॉ. प्रा. सुरेश भृगुवार यांचा परिचय करून दिला. अध्यक्ष डॉ. जोशी यांच्या हस्ते मर्ढेकरांची काव्यशैली या ग्रंथाचे लेखक डॉ. प्रा. सुरेख भृगुवार यांना कै. रा. श्री. जोग समीक्षा पुरस्कार प्रदान करण्यात आला. कॉन्टिनेन्टल प्रकाशनाच्या अमृता ऋतुपर्ण कुलकर्णी यांना ग्रंथाच्या प्रकाशकाचा पुरस्कार प्रदान करण्यात आला. यानंतर पुरस्कार विजेत्या प्रकाशिका अमृता कुलकर्णी यांनी मनोगत व्यक्त केले. 'मर्ढेकरांची कविता' या विषयावर पुरस्कार विजेते डॉ. प्रा. सुरेश भृगुवार यांनी व्याख्यान दिले. त्या अगोदर डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी कै. रा. श्री. जोग यांच्याविषयी मनोगत व्यक्त केले. डॉ. कल्याणी दिवेकर व डॉ. मनोहर जाधव यांनी परीक्षक म्हणून काम केले. डॉ. न. म. जोशी यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. दीपक करंदीकर व प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले.

**११) दि. २४ मार्च २०१२ : सौ. पुष्पा पुसाळकर स्मरणार्थ पुरस्कार :** उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीबद्दल परिषदेच्यावतीने दिला जाणारा पुरस्कार यंदा राजहंस प्रकाशनाला एका अनौपचारिक समारंभात प्रदान करण्यात आला. या पुरस्काराचे हे दुसरे वर्ष आहे. 'राजहंस'चे दिलीप माजगावकर यांनी प्रकाशक म्हणून हा पुरस्कार स्वीकारला. 'राजहंस'च्या 'वेणूविज्ञान' या ग्रंथासाठीचा हा पुरस्कार साहित्यिक राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते देण्यात आला. यावेळी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व कोषाध्यक्ष सुनील महाजन हे उपस्थित होते.

**१२) दि. ७ एप्रिल २०१२ : ज्येष्ठ कवी ग्रेस यांना श्रद्धांजली सभा :** ज्येष्ठ कवी ग्रेस यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांची सभा आयोजित केली होती. या सभेत चंद्रकांत वानखेडे यांनी कवी ग्रेस यांची कविता म्हटली, नंदा पैठणकर, श्रीनिवास वारुंजीकर, डॉ. नीलिमा गुंडी, प्रा. मिलिंद जोशी, रविमुकुल, संजय भास्कर जोशी, डॉ. माधवी वैद्य, डॉ. अनिल अवचट यांनी अध्यक्षीय समारोप केला. शेवटी उपस्थितांनी एक मिनिट उभे



अनुक्रमणिका

राहून श्रद्धांजली अर्पण केली.

**१३) दि. १० एप्रिल २०१२ : ज्ञानकोषाकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन :** पुण्यातील कमला नेहरू उद्यानात कै. केतकरांची समाधी आहे. त्या समाधीला हार व फुले अर्पण करून त्यांच्या पवित्र स्मृतीस अभिवादन करण्यात आले. या प्रसंगी परिषदेचे पदाधिकारी डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, दीपक करंदीकर, डॉ. कल्याणी दिवेकर व परिषदेचे कार्यालयीन सेवकांपैकी श्री. डहाळे व केळकर व इतर नागरिक उपस्थित होते. नगरसेविका अनुराधा सहस्त्रबुद्धे इत्यादी उपस्थित होते. उपस्थितांना पेढे वाटप केले गेले.

**१४) दि. १७ एप्रिल २०१२ : कै. शं. ना. जोशी ग्रंथ पुरस्कार प्रदान सोहळा :** प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. श्री. मो. शं. जोशी यांनी कै. जोशींच्या आठवणींना उजाळा दिला. पद्‌माकर कुलकर्णी यांनी डॉ. येळेगावकरांचा परिचय करून दिला. परीक्षकांपैकी श्री. पाडुरंग बलकवडे यांनी मनोगत व्यक्त केले. अनंत दीक्षित यांच्या हस्ते डॉ. श्रीकांत येळगावकर यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. नंतर पुरस्कार विजेत्या डॉ. येळगावकर यांनी मनोगत व्यक्त केले. अनंत दीक्षित यांनी अध्यक्षीय समारोप केला. अध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले व सूत्रसंचालन कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले.

**१५) दि. १८ एप्रिल २०१२ : विरासत सप्ताह :** परिषद व जनवाणी आणि अनन्वय फाऊंडेशन संस्थांच्यावतीने 'विरासत सप्ताह' अंतर्गत 'जागतिक वारसा दिन' साजरा करण्यासाठी कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. आठवडाभर चालणाऱ्या या कार्यक्रमातील आजचा दिवस परिषदेतील वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयात सकाळी ९ ते रात्री ८ पर्यंत दुर्मिळ ग्रंथांचे प्रदर्शन भरविण्यात आले होते. तसेच महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वास्तूचे दर्शन जिज्ञासूंना घडविण्यात आले. सायंकाळी ज्येष्ठ कवयित्री शांताबाई शेळके व कवी विं. दा. करंदीकर यांच्या 'अनन्वय' या संस्थेने तयार केलेली चित्रफीत दाखविण्याचा कार्यक्रम घेण्यात आला. या निमित्ताने परिषदेच्या 'साहित्यिकांची स्वाक्षरी' ह्या उपक्रमांचा प्रारंभ ज्येष्ठ साहित्यिक म. श्री. दीक्षित यांच्या स्वाक्षरीने झाला. यावेळी डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, जनवाणीच्या प्राजक्ता पणशीकर उपस्थित होते.

**१६) दि. १९ एप्रिल २०१२ : कै. कमोडर मधुकर केशव लेले स्मृतिदिन व्याख्यान :** 'अर्थक्रांती'चळवळीचे अर्थतज्ज्ञ श्री. अनिल बोकील यांचे 'भारताची आर्थिक गोंधळाची स्थिती आणि वर्तमान' या विषयावर व्याख्यान झाले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. डॉ. व्ही व्ही. घाणेकर यांनी कमोडर लेले यांच्याविषयी माहिती सांगितली. भाषणाच्या शेवटी उपस्थितांत श्रोत्यांनी वक्त्यांशी प्रश्नोत्तरांच्या माध्यमातून संवाद साधला. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन केले.

**१७) दि. २३ एप्रिल २०१२ : जागतिक ग्रंथदिन :** 'पुस्तकांनी आम्हाला काय दिले?' या विषयावर चर्चा आयोजित करण्यात आली होती. या चर्चेत रविमुकुल, ह. मो. मराठे, भानू काळे, श्याम जोशी, सुनीता राजे पवार यांनी आपापल्या क्षेत्रातील नेमके विचार मांडले. या सर्वांना परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रश्न विचारून, सूत्रसंचालन करून बोलते केले. त्यावेळी चर्चा रंगली. श्रोत्यांचा भरघोस प्रतिसाद या कार्यक्रमास लाभला.

**१८) दि. २७ एप्रिल २०१२ : कवी यशवंत पुरस्कार वितरण समारंभ :** कवी वलय मुळगुंद यांच्या 'एक झाड शब्दांचं' या कविता संग्रहासाठी अध्यक्ष अरुणा ढेरे यांच्या हस्ते 'कवी यशवंत' पुरस्कार देण्यात आला. स्वागत व सूत्रसंचालन





अनुक्रमणिका

कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. अध्यक्ष अरुणा ढेरे व परीक्षक मीरा शिंदे यांना पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. किशोर व सौ. चारुता पेंढारकर यांचा सत्कार कार्यवाह नंदा सुर्वे यांनी पुष्पगुच्छ देऊन केला. किशोर पेंढारकर यांनी मनोगत व्यक्त केले. त्यांनी कवी यशवंत यांची 'आई' कविता सादर केली. वलय मुळगुंद यांचा परिचय कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी करून दिला. मीरा शिंदे यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. यानंतर वलय मुळगुंद यांना अरुणा ढेरे यांच्या हस्ते कवी यशवंत पुरस्कार प्रदान करण्यात आला. वलय मुळगुंद यांनी पुरस्कार मिळाल्याबद्दल आपले विचार प्रकट केले. अरुणा ढेरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

**१९) दि. २१ मे २०१२ : नाट्यविभाग : नाट्यवाचनाचा कार्यक्रम :** म.सा.प. व स्वयम् औरंगाबाद आयोजित स्त्री-पुरुषसंबंधावर आधारित 'वेलांटी आणि मात्रेचे सूत्र' या अजित दळवी यांच्या नाटकाच्या वाचनाचा कार्यक्रम झाला. अनुया दळवी, लक्ष्मीकांत धोंड, वसंत दातार, पद्मनाभ पाठक, ॲड. सुजाता पाठक, डॉ. सर्वेषा महाजन यांनी प्रभावी नाट्यवाचन केले. सूत्रसंचालन प्रकाश पायगुडे यांनी केले. श्रोत्यांचा चांगला प्रतिसाद या कार्यक्रमाला मिळाला.

**२०) दि. २६ मे २०१२ : वर्धापनदिनाच्या पूर्वसंध्येचे कार्यक्रम : वार्षिक ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिक वितरण समारंभ :** मा. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या प्रमुख उपस्थितीत व त्यांच्या शुभहस्ते यंदाचा वार्षिक ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिक वितरण समारंभ भव्य प्रमाणात साजरा झाला. अध्यक्षस्थानी म.सा.प.चे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी व कोषाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते व्यासपीठावरील मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. डॉ. द. ता. भोसले, डॉ. रावसाहेब कसवे, श्री. चंद्रकांत शेवाळे हे उपस्थित होते. कार्यकारिणी सदस्य डॉ. कल्याणी दिवेकर यांना डॉ. कोत्तापल्ले यांचा परिचय करून दिला. नंतर डॉ. कोत्तापल्ले यांच्या हस्ते पारितोषिक वितरण समारंभ झाला. (विविध पुरस्कार प्राप्त ग्रंथ व पुरस्कार विजेते यांची सविस्तर यादी इतरत्र प्रकाशित केली आहे.) त्यानंतर पारितोषिक विजेत्यांपैकी प्रा. फ. मुं. शिंदे व डॉ. जया जगताप यांनी आपली मनोगते व्यक्त केली. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी आपले विचार प्रकट केले. परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह नंदा सुर्वे यांनी केले. कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर यांनी आभार मानले. मृणाल धोंगडे हिने शारदास्तवन केले.

**२१) दि. २७ मे २०१२ : म. सा. प. चा १०६ वा वर्धापनदिन समारंभ :** महाराष्ट्र साहित्य संस्कृती महामंडळाच्या विद्यमान अध्यक्ष उषा तांबे या प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होत्या. समारंभाच्या पूर्वार्धात स्त्री सखी मंच, तळेगाव या संस्थेच्या वतीने 'विंदानुभूती' हा कविवर्य विंदा करंदीकर यांच्या कवितांवर आधारित बहारदार कार्यक्रम साजरा झाला. कल्पना भोपळे, सुलभा दिघे, अनिता ओक, मीनल कुलकर्णी, दीप्ती आपटे, दीपक आवटे, प्रदीप जोशी या कलावंतांनी यात सहभाग घेतला होता. मुख्य समारंभाचे प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य व कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी व्यासपीठावरील मान्यवरांचे स्वागत केले. उषा तांबे, श्रीनिवास कुलकर्णी यांना मा. उषा तांबे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. त्यानंतर भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार 'ग्रंथावली'चे मा. दिनकर गांगल यांना मा. उषा तांबे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. नंतर दोनही

सन्मानप्राप्त व्यक्तींनी आपापली मनोगते व्यक्त केली. मा. उषा तांबे यांनी प्रमुख पाहुण्यांचे मनोगत व्यक्त केले. परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले. साहिल पुंडलीक यांनी शारदास्तवनाने समारंभाचा प्रारंभ केला. या प्रसंगी उपस्थितांना परिषदेतर्फे पेढ्यांचे वाटप करण्यात आले.

**२२) दि. २९ मे २०१२ : 'कृष्णमुकुंद' पारितोषिक वितरण समारंभ :** डॉ. नलिनी गुजराथी व डॉ. मोहन गुजराथी यांच्या देणगीतून कोणत्याही विषयावरील संशोधनात्मक ग्रंथाला यंदाच्या वर्षापासून 'कृष्णमुकुंद' यांच्या नावाने रुपये दहा हजार, सन्मानचिन्ह व सन्मानपत्र असा स्वरूपाचा हा पुरस्कार देण्याची सुरुवात झाली. पहिल्याच वर्षीचा 'कृष्णमुकुंद' पुरस्कार अभिजित घोरपडे यांच्या 'संथ वाहते' या ग्रंथाला पुणे विद्यापीठाचे भौतिकशास्त्र विभाग प्रमुख डॉ. पंडित विद्यासागर यांच्या शुभहस्ते प्रदान करण्यात आला. अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. डॉ. नलिनी गुजराथी यांनी भूमिका स्पष्ट करणारे विचार मांडले. त्यानंतर डॉ. पंडित विद्यासागर यांच्या हस्ते लेखक अभिजित घोरपडे यांना 'कृष्णमुकुंद' पुरस्कार प्रदान करण्यात आला. श्री. घोरपडे यांनी मनोगत व्यक्त केले. नंतर डॉ. विद्यासागर यांनी आपले विचार मांडले. अध्यक्ष डॉ. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले व डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, म.सा.प. पुणे.

---

## – शाखा कार्यवृत्त नोंद –

**१) म.सा.प. शाखा : जुळे सोलापूर : १. दि. २४.२.१२ : आंतरशालेय हस्तलिखित स्पर्धा २०१२ :** १४ शाळांचा सहभाग. मा. आमदार प्रणिती शिंदे यांच्या हस्ते व आयुक्त हिंमतराव देशभ्रतार यांच्या अध्यक्षतेखाली पारितोषिक वितरण समारंभ झाला. प्रमुख उपस्थित प्रशांत दिवेकर होते. सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी यांनी केले. आभार गिरीश दुनाखे यांनी मानले. दि. ८ मार्च २०१२ – जागतिक महिला दिनानिमित्त सावित्रीबाई फुले या विषयावर सुधाकर जोशी यांचे व्याख्यान झाले.

**दि. २७.३.२०१२ :** कवी ग्रेस यांना वृक्षारोपण करून श्रद्धांजली वाहण्यात आली. डॉ. वासुदेव रायते, मनोज कुलकर्णी, दत्ता हलसगीकर इत्यादींनी आपले मनोगत व्यक्त केले.

**२) म.सा.प. शाखा पाटण : दि. २१.१.२०१२ : कविसंमेलन :** अध्यक्ष प्रकाश घोडके. प्रास्ताविक : रामकली पावसकर परिचय : प्रा. डॉ. पांडुरंग ऐवळे. आभार कोषाध्यक्ष डॉ. एस. डी. पवार व सूत्रसंचालन प्रा. राऊत यांनी केले.

**३) म.सा.प. शाखा सोलापूर :**

**१. दि. २९.२.२०१२ : जागतिक मराठी दिन :** 'मला भेटलेले कुसुमाग्रज' या विषयावर फैय्याज शेख यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. श्रीकांत येळेगावकर यांनी केले. स्वागत डॉ. बोल्ली यांनी केले. पद्माकर कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले. जे. जे. कुलकर्णी यांनी आभार मानले. कुसुमाग्रजांच्या काही कविता व नाटकातील अंशांचे यावेळी वाचन करण्यात आले.

**२. दि. ३० मार्च २०१२ : कवी ग्रेस यांच्या श्रद्धांजलीपर सभा :** सूत्रसंचालन प्रा. डॉ. व्यंकटेश मुळे यांनी केले. अनेक वक्त्यांनी श्रद्धाजलीपर विचार प्रकट केले. डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली यांनी समारोप केला.

**४) म.सा.प. शाखा : चाळीसगाव :**

**१. दि. ३१ जानेवारी २०१२ :** 'अहिराणी काव्यातील स्त्रीजीवन' या विषयावर प्रा. डॉ. सौ. उषा सावंत यांचे व्याख्यान झाले. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन डॉ. मालपुरे व श्री. निकम यांनी केले.

**२. दि. २७ फेब्रुवारी २०१२ :** 'कुसुमाग्रजांचे साहित्य' या विषयावर प्रा. डॉ. एकनाथ पगार यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. मालपुरे, सूत्रसंचालन : कविता साळुंखे, आभार : श्री. धुमाळ.

**५) म.सा.प. शाखा : शिराळा :**

**१. २७.३.२०११ :** प्रदीप पाटील व प्रा. भिमराव गायकवाड यांच्या उपस्थितीत कवी संमेलन झाले. सूत्रसंचालन प्रा. डॉ. दुकळे यांनी केले.

**२. दि. ८ मे. २०११ : कै. जगदीश खेबुडकर श्रद्धांजली सभा :** प्राचार्य शिवाजी कुंभार व बाबा परिट यांनी श्रद्धांजलीपर विचार प्रकट केले. तसेच वि. आ. बुवा व चारुता सागर यांनाही श्रद्धांजली वाहण्यात आली.

**३. दि. २ सप्टेंबर २०११ :** स्व. द. का. हसबनीस यांच्या साहित्यावर प्रा. डॉ. मधुकर हसबनीस यांचे व्याख्यान झाले. आमदार मानसिंगराव नाईक अध्यक्षस्थानी होते. प्रा. डॉ. दुकळे व पाटील यांनी सूत्रसंचालन व नाथा हसबनीस यांनी आभार मानले.

**४. दि. २४ जाने. २०१२ :** 'संतसाहित्य व आधुनिकता' या विषयावर प्रा. मिलिंद जोशी यांचे व्याख्यान झाले. अध्यक्ष बाबासाहेब पवार होते. परिचय प्रा. दुकळे यांनी व आभार नीता जोखे यांनी मानले. सूत्र प्रा. हिरेमल यांनी सांभाळली.

**५. दि. ११ मार्च २०१२ :** पांडुरंग टिळे यांच्या 'संस्कारदीप लावू घरा' या पुस्तकाचे प्रकाशन झाले. डॉ. मोकाशी व शेटफळे यांच्या हस्ते प्रकाशन झाले. स्वागत व प्रास्ताविक आणि आभार श्री. पाटील व शैला मिरजकर यांनी मानले. सूत्रसंचालन ज्योती जोशी, ओळख प्रा. मिरजकर यांनी करून दिली.

**६) म.सा.प. शाखा : बार्शी :**

**१. शा. अमरशेख पुरस्कार :** पद्मिनीदेवी शिंदे, डॉ. संजीव कुमार सोनावणे, श. मा. पाटील, ज्योतिराम फडतरे यांना डॉ. गो. मा. पवार यांच्या हस्ते गौरविण्यात आले. प्रास्ताविक श्री. निपाणीकर, परिचय : डॉ. दीपा सावळे, परीक्षकांचे मनोगत मुकुंदराज कुलकर्णी यांनी व्यक्त केले. अध्यक्ष विनय सिंघवी होते. सूत्रसंचालन श्री. कुलकर्णी व आभार प्रदर्शन श्री. मुलाणी यांनी केले.

**२. दि. ११ मार्च २०१२ : होळीनिमित्त हास्यरंग :** सुरेश पाठक, दत्ता गोसावी, अनुराधा देशमुख, शांता टाकळीकर, इ. भाग घेतला. प्रा. कोरे यांनी सूत्रसंचालन केले. श्री. कुलकर्णी यांनी आभार मानले.

**७) म.सा.प. शाखा : श्रीरामपूर :**

**१ एप्रिल २०१२ :** कवी ग्रेस व बाळासाहेब खटोड यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. या सभेचे सूत्रसंचालन प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. उपाध्ये यांनी केले. प्रा. सौ. भाग्यश्री बढे यांनी कवितावाचन केले.

**८) म.सा.प. शाखा : वारजे-कोथरुड :**

**दि. ११.१.२०१२ :** शाखेचा पहिला वर्धापनदिन साजरा झाला. प्रमुख पाहुणे भारत सासवे उपस्थित होते.

**दि. ३१ मार्च २०१२ :** डॉ. अश्विनी धोंगडे यांनी डॉ. अनिल अवचट यांची मुलाखत घेतली.

**दि. २४ मे २०१२ :** सभासदांचा साहित्यिक मनोरंजनपर कार्यक्रम झाला.

**९) म.सा.प. शाखा (जळगाव-पाचोरा शाखा) :**

**दि. १ मे २०१२ : महाराष्ट्र दिन : कविसंमेलन :** डॉ. ए. पी. चौधरी, प्रा. किसन पाटील प्रमुख अतिथी अजीज नवाज़ राही उपस्थित होते. अनेक कवींनी सहभाग घेतला. सूत्रसंचलन अशोक कौतुक कोळी यांनी केले. आभार प्रा. डॉ. वासुदेव वले यांनी मानले. जयवंत बोदडे यांच्या 'पोर्ट्रेट' व 'टिच्चू आणि विल्लास' या पुस्तकांचे प्रकाशन झाले.

**१०) म.सा.प. शाखा : पिंपरी-चिंचवड :**

**दि. २० मे २०१२ :** कथाकथनाचा कार्यक्रम झाला. विनिता ऐनापूरे व प्रा. तुकाराम पाटील यांनी कथा सांगितल्या. प्रमुख पाहुणे डॉ. इंगोले होते. शाखा अध्यक्ष राजन लाखे, माधुरी ओक उपस्थित होते.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
कार्यवाह, म.सा.प. पुणे.

---

## १ एप्रिल २०१० पासूनचे आजीव सभासद

११५) लाळे प्रशांत वासुदेव, पुणे
११६) सावरगांवकर चित्रा, पुणे
११७) गिरोडे कल्पना दिलीप, पुणे
११८) गोसावी सुजाता श्री, पुणे
११९) अविनाश विठ्ठल पाटील, नवीन पनवेल
१२०) आमोद मुकुंद अभ्यंकर, कोल्हापूर
१२१) चंद्रकला गुलाबराव खोजे, पुणे
१२२) वसंत नारायण दाते, डोंबिवली
१२३) प्रा.डॉ. शेळके बाळासाहेब शंकर, श्रीरामपूर
१२४) दीपाली मुकुंद दातार, पुणे
१२५) संकपाळ सुशील रामचंद्र, इचलकरंजी
१२६) फाटक श्रीकांत सखाराम, इचलकरंजी
१२७) सुरा पराग सुरेश, पुणे
१२८) शिंदे नवनाथ अंगद, पुणे
१२९) पाटणकर श्रीकांत विष्णू, सोलापूर
१३०) चाफळकर सीमंतिनी अमोल, सोलापूर
१३१) कुलकर्णी पुरुषोत्तम पांडुरंग, सोलापूर
१३२) देशमुख सुभाष सुरेशचंद्र, सोलापूर
१३३) पानगे भाऊसाहेब, पिंपरी
१३४) जाधव दीपक शिवाजी, लिमयेवाडी
१३५) गायकवाड गोविंद गोपाल, सांगवी
१३६) गोडबोले चित्कला घन:शाम, पुणे
१३७) वेडके अमृतराव नामदेवराव
१३८) वेडके (सूर्यवंशी) सचिन सुभाषराव
१३९) फुले स्वाती हेमंत
१४०) दीक्षित संजय गणपत
१४१) रासकर मधुबाला कुंडलिक
१४२) भोसले दिलीपसिंह ज्ञानोबाराव
१४३) भोसले मधुबाला दिलीपसिंह
१४४) आवटे शांताराम
१४५) देशपांडे व्यंकेटश
१४६) पवार सविता माधवराव
१४७) राजदेव वर्षा अविनाश, पुणे
१४८) भोसलेपाटील ज्ञानेश्वर दगडू, आळंदी
१४९) कांवळे ऋषिकेश, औरंगाबाद
१५०) गवई ---
१५१) चंटवाल रूबी पी., निगडी
१५२) वारुळे प्रशांत सीताराम, चिंचवड
१५३) शेट्टी करुणाकरन गोपी
१५४) देसाई विजय श्रीश्वर, निगडी
१५५) गणपुले शितपागौरी प्रसाद, आकुर्डी
१५६) परंडेकर प्रसाद गोविंदराव, पुणे
१५७) नेवस्कर गजानन कृष्णा, पुणे
१५८) मोहिते अपर्णा सतीशचंद्र, निगडी
१५९) गर्ग चंद्रभान छोटुराम, चिंचवड
१६०) गणपुले प्रसाद वसंत, आकुर्डी
१६१) मोने मीता अरविंद, पुणे
१६२) कदम शिवाजीराव श्रीपतराव, पुणे
१६३) डॉ. राजेश्री, नवी मुंबई
१६४) पाठक सूर्यकांत श्रीराम, पुणे
१६५) नाईक विजय घोडोपंत, चिंचवड
१६६) नाईक अमिता विजय, चिंचवड
१६७) झोपे गिरीश जसंत, चिंचवड
१६८) पाटील शेखर संभाजीराव, चिंचवड
१६९) चड्ढा दिलीप कृष्णराव, निगडी
१७०) डिसोजा बाबू फिलीप, निगडी
१७१) शिंदे मोहन शामचंद्र, बोरगाव
१७२) गायकवाड पंडित बाबूराव, धुळे
१७३) पवार पंजाबराव हरचंद, धुळे
१७४) भुसारे मधुचंद लक्ष्मण, कांदुंबी
१७५) कर्वे ऋचा मिलींद, पुणे
१७६) देशपांडे संध्या प्रशांत, पुणे
१७७) आलेगांवकर प. म., पुणे
१७८) परदेशी मुकुंद बाळकृष्ण
१७९) परदेशी शुभांगी मुकुंद, पुणे
१८०) भोईटे प्रकाश ज्ञानेश्वर, पुणे
१८१) करंदीकर पराग हनुमंत, पुणे
१८२) पाटील दिनकर प्रल्हादराव, डोंबिवली
१८३) विधाते सुवर्णलता जगसिंग, पुणे
१८४) वकील जयश्री हेरंब
१८५) फडणीस नम्रता आशिष, पुणे
१८६) कुलकर्णी चंद्रहास रघुनाथ, पुणे
१८७) देशपांडे जयंत पांडुरंग, पुणे
१८८) गोगावले योगेश सीताराम, पुणे
१८९) आहेर प्रशांत काशिनाथ, पुणे
१९०) सावंत जिजाबाई अंकुश, पुणे
१९१) देशमुख नरेंद्र वसंतराव, नाशिक
१९२) वीकन्हालकर वृषाली, वाई
१९३) देशपांडे मोहन सखाराम, सोलापूर
१९४) चौधरी अरविंद, सोलापूर
१९५) ढेंबरे प्रकाश शंकर, इस्लामपूर
१९६) पाटील तात्यासाहेब अण्णा, इस्लामपूर
१९७) ठोकले द[illegible] भिमाप, काळेवाडी
१९८) देशपांडे प्राची प्रकाश, आकुर्डी

# श्रद्धांजली

संगीता सरदेसाओी



प्रसाद मासिकाचे व प्रसाद प्रकाशनाचे संपादक श्री बापूसाहेब तथा मनोहर य. जोशी यांना जाऊन १० जून २०१२ ला वर्ष पूर्ण झाले. य. गो. जोशी यांच्या नंतर बापूसाहेब जोशी यांनी प्रसाद प्रकाशन व प्रसाद मासिकाचे संपादनाचे काम ५२ वर्षे पाहिले.

प्रसाद प्रकाशनाने अर्थात प्रकाशक बापूसाहेब जोशी यांनी मराठी भाषेतील उत्तोत्तम ग्रंथ निर्माण करून एक मोठे योगदान दिले आहे. त्यातील महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे आपले वेद आपली पुराणे ही ग्रंथमाला, शांकर ग्रंथावली, देवभाषेचे देणे, षट्दर्शने, पंचमहाकाव्ये, सुबोध ज्ञानेश्वरी अशी अनेकानेक उत्तम ग्रंथ निर्माण करून मराठी भाषेच्या दालनात समृद्धीची लेणी बापूसाहेबांनी वाढवली.

य. गो. जोशी व मामा दांडेकर यांनी सुरू केलेला 'प्रसाद' हा अंक दर महिना उत्तम गुणवत्ता घेऊन नियमीत तारखेला प्रसिद्ध होत आहे. हे काम जोशींच्या तिसऱ्या पिढीपर्यंत आता चालू आहे, हा मराठी मासिकाचा एक विक्रमच म्हटला पाहिजे. वडिलांनंतर (य.ग.जोशी) मुलाने (मनोहर जोशी) त्यांच्यानंतर मुलीने (सध्याची प्रसादची संपादिका उमा बोडस) हा वसा चालू ठेवला आहे.

भारतीय संस्कृती, साहित्य घराघरातच नाहीतर परदेशात पोहचवण्याचे काम बापूसाहेबांच्या आर्शिवादाने, इच्छेनेच चालू झाले आहे त्यासाठी उमा बोडस हीने 'प्रसाद ज्ञानपीठा'ची स्थापना केली आहे.

प्रसाद ज्ञानपीठ हे On-line व Off-line दोनही द्वारा प्राचीन भारतीय संस्कृती, सभ्यता, विज्ञान, तत्त्वज्ञान व साहित्य यांचा परिचय व त्यानंतर सखोल ज्ञान देणारे एकमेव माध्यम आहे. संस्कृत व तिच्याचसारख्या असणाऱ्या पाली, प्राकृत यासारख्या आत्ता अगम्य वाटणाऱ्या भाषांतील ज्ञान सर्वांना या भाषांच्या अध्ययनातूनच खुले व्हावे हे प्रसाद ज्ञानपीठाचे मुख्य. उद्दिष्ट्य आहे. भारतीय प्राचीन तत्त्वज्ञानाचा, ज्ञानाचा, कला व साहित्याचा मानवी जीवन व पर्यायाने सर्व समाजजीवनावर परिणाम होऊन सर्व सजीव-निर्जीवांमध्ये एकात्म भावना निर्माण व्हावी हे ज्ञानपीठांचे ध्येय आहे. पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारांनी व सीमांनी हातात हात घालून काम केले व विचारमंथन घडले तरच हे ध्येय गाठता येऊ शकते आणि याचा पाया घालण्याचे काम प्रसाद ज्ञानपीठाने सुरू केले आहे. याचसोबत आयुर्वेद, भारतीय स्थापत्यशास्त्र, प्राचीन भारतीय विज्ञान या ज्ञानदृष्ट्या मोलाच्या शाखांचाही अभ्यास 'अध्ययन-अध्यापन' प्रक्रियेतून करण्याची सोय ज्ञानपीठाने उपलब्ध करून दिली आहे. या ज्ञानपीठाद्वारे संस्कृत संभाषण; विविध विषयांवरील संदर्भ, संस्कृत, पाली व प्राकृत या भाषांची वैयक्तिक शिकवणी, भाषासमन्वय, या व यासारख्या अनेक सुविधा सर्वांसाठी उपलब्ध करून दिल्या आहेत. त्यांचा सर्वांनी नक्की लाभ घ्यावा. बापूसाहेबांनंतर एक वर्षाने त्यांच्या पुण्यतिथीला हे काम चालू करून त्यांच्या कन्येने वडिलांना श्रद्धांजलीच वाहिली आहे.

◇◇◇

# 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्यावतीने




# 'शब्दमित्र'

## हे त्रैमासिक लवकरच बालकुमारांच्या भेटीला !

• मुख्य संपादक : **डॉ.माधवी वैद्य** (कार्याध्यक्ष) • प्रकाशक : **प्रा.मिलिंद जोशी** (प्रमुख कार्यवाह)
• कार्यकारी संपादक : **अमृता वाळिंबे, प्रशांत खुंटे** • संकल्पना – संयोजन : **माऊस मल्टिमिडिया**, पुणे.
• विशेष सहकार्य : **सर्व सदस्य, कार्यकारी मंडळ, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.**

'मुलं वाचतच नाहीत', अशी ओरड हल्ली सगळीकडे ऐकू येते. विविध दृक्–श्राव्य माध्यमांचा वाढता प्रभाव हे त्यामागचं एक कारण सांगितलं जातं. 'हातात घेऊन वाचावंच असं वाटायला लावणारं फारसं काही मुलांसाठी दिसतच नाही', असंही बोललं जातं.

या पार्श्वभूमीवर 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे'च्यावतीने सकस साहित्याने समृद्ध असं, आजच्या बालकुमारांना आपलंस वाटेल असं; 'शब्दमित्र' त्रैमासिक सुरू केलं आहे. या त्रैमासिकाचा पहिला अंक येत्या ऑगस्टमध्ये प्रकाशित होणार आहे. बालकुमारांच्या सर्जनशीलतेला वाव देणाऱ्या, त्यांचं कुतूहल शमवणाऱ्या आणि त्यांना मोठं होता होता 'समजदार' बनवू पाहणाऱ्या 'शब्दमित्र'चं स्वागत होईल, अशी आम्हाला खात्री आहे.

'शब्दमित्र' मध्ये असतील –

नामवंत लेखक–कवींसोबतच छोट्यांच्या कथा–कविता, आधुनिक शिलेदारांच्या गोष्टी, छोट्यांनी घेतलेल्या मोठ्यांच्या मुलाखती, विज्ञान–गणिताशी दोस्ती, साहस–सफरी– मस्ती, आवर्जून वाचावेत – पाहावेत अशा पुस्तक – सिनेमा – नाटकांची झलक आणि अभ्यास मंत्रासोबतच धम्माल कोडी व अफलातून खेळही!

**चला तर मग करूया दोस्ती 'शब्दमित्र'शी!**

'शब्दमित्र'च्या ऑगस्टच्या तसेच दिवाळी अंकाची नोंदणी आजच करा!
'शब्दमित्र'च्या ऑगस्टच्या अंकाचे मूल्य : रुपये ३० फक्त!
दिवाळी अंकाचे मूल्य : रुपये ७० फक्त!
**दोन्ही अंकांची नोंदणी एकत्र केल्यास १०० रुपयात दोन्ही अंक घरपोच मिळतील.**

• अधिक माहितीसाठी संपर्क
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे – ४११०३०, दूरध्वनी क्र. : ०२०/२४४७५९६३ किंवा ३२५४५६५९
किंवा : **महेंद्र मुंजाळ** (कार्यवाह, ग्रंथालय विभाग, म सा प), भ्रमणध्वनी : ९८५०५९८४८७

जानेवारी (२०१३) पासून 'शब्दमित्र' दर तीन महिन्याला प्रसिद्ध होईल. त्यासंबंधीची अधिक माहिती ऑगस्टच्या पहिल्या अंकात तसेच दिवाळी विशेषांक (२०१२) मध्ये प्रसिद्ध करू.



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : April to June 2012
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*

पु.स सोनावले शाम
११५. डी.एस्. के. विश्वरोहिणी
के-१०२, धायरी,
पुणे - ४११ ०४१



बुक-पोस्ट




प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.






